# भक्तराज हनुमान

## (१)

**प्रनवउँ पवनकुमार खल बन पावक ग्यानघन।**
**जासु हृदय आगार बसहिं राम सर चाप धर॥**

भगवान् शंकर भगवती सतीबरोबर कैलास पर्वताच्या एका उंच शिखरावर बसलेले होते. वडाच्या दाट सावलीत त्यांच्या कर्पूराप्रमाणे असलेल्या पांढऱ्या शुभ्र अंगावर भुऱ्या रंगाच्या जटा विखुरलेल्या होत्या. हातात रुद्राक्षांची माळ, गळ्यात सर्प आणि समोरच नंदी बसलेला होता. त्यांचे बरोबरचे सेवक तेथून काही अंतरावर अनेक प्रकारचे खेळ खेळत होते. त्यांच्या मस्तकावर चंद्रमा आणि गंगेची अमृतमय धार असल्याकारणाने तिसऱ्या नेत्रातील भयंकर ज्वाळा शांत होती. कपाळावरील भस्म फारच सुंदर दिसत होते.

अचानक राम राम असे म्हणत त्यांनी आपली समाधी भंग केली. एका अपूर्व भावनेने भगवान शंकर आपल्याकडे पाहात आहेत, असे सतीने पाहिले. ती समोर उभी राहिली आणि हात जोडून नम्रतेने म्हणू लागली- 'स्वामी ! यावेळी मी आपली काय सेवा करू ? आपणांस काही सांगायचे आहे काय? आपल्या चेहऱ्यावरून तर असाच भाव प्रगट होत आहे.' भगवान शंकर म्हणाले, 'प्रिये ! आज माझ्या मनात एक मोठा शुभ संकल्प आला आहे. मी विचार करीत आहे की ज्यांचे मी निरंतर ध्यान करीत असतो, ज्यांचे नाम एकसारखे घेऊन सद्‌गदित होत असतो, ज्यांच्या वास्तविक स्वरूपाचे स्मरण करून मी समाधिस्थ होतो, तेच माझे भगवान तेच माझे प्रभू, अवतार धारण करून भूलोकी येत आहेत. सर्वच देवगण त्यांच्याबरोबरच अवतार घेऊन त्यांच्या सेवेचा सुयोग प्राप्त करू इच्छितात, तर मग मीच का वंचित राहू ? मीदेखील तेथेच जातो आणि त्यांची सेवा करून युगायुगांची लालसा पूर्ण करतो व आपल्या जीवनाचे सार्थक करतो.

भगवान शंकरांचे हे वचन ऐकून सतीला एकदम समजेना, की यावेळी काय करणे उचित आहे आणि काय करणे अनुचित आहे. तिच्या मनात दोन प्रकारचे भाव जागृत होत होते. एक असा की, माझ्या पतिदेवांची अभिलाषा पूर्ण झाली पाहिजे आणि दुसरा भाव असा होता की, माझ्यापासून त्यांचा वियोग होऊ नये. तिने थोडावेळ विचार करून म्हटले- 'प्रभो ! आपला संकल्प तर फारच सुंदर आहे. जसे मी आपल्या इष्टदेवाची-आपली सेवा करू इच्छिते तसेच आपणही आपल्या इष्टदेवाची सेवा करू इच्छिता. परंतु वियोगाच्या भीतीने माझ्या हृदयाची काय स्थिती होत आहे, हेच मला कळेनासे झाले आहे. कृपा करून आपण मला अशी शक्ती द्या की, ज्यामुळे माझे मन आपल्याच सुखात सुख मानू लागेल. आणखी एक गोष्ट, भगवंतांचा अवतार या वेळी रावणाला मारण्यासाठी होत आहे. तो आपला फार मोठा भक्त आहे. त्याने तर स्वत:ची मस्तकेही कापून आपणांस अर्पण केली आहेत. अशा परिस्थितीत आपणांस त्याला मारण्यासाठी भगवंतांना कसे साहाय्य करता येईल ?'

भगवान शंकर हसू लागले. ते म्हणाले-'देवी ! तू फार भोळी आहेस. यात वियोगाची तर गोष्टच नाही. मी एका रूपाने अवतार घेऊन त्यांची सेवा करीन आणि दुसऱ्या रूपाने तुझ्याजवळ राहून तुला त्यांच्या लीला दाखवीन. तसेच वेळोवेळी त्यांचेकडे जाऊन त्यांची स्तुती, प्रार्थना करीन. आता राहिली तुझी दुसरी शंका-तसे पाहिले, तर रावणाने जशी माझी भक्ती केली आहे, तशीच त्याने माझ्या एका अंशाची अवहेलनाही केली आहे. तुला माहीत आहेच की मी अकरा रूपांत राहतो. जेव्हा त्याने आपली दहा मस्तके मला अर्पण करून माझी पूजा केली होती, त्यावेळी त्याने माझ्या एका अंशाची पूजा केली नव्हती. आता मी त्याच अंशाच्या रूपात त्याच्या विरुद्ध युद्ध करू शकेन.आणि आपल्या प्रभूची सेवाही करू शकेन. मी वायुदेवतेच्याद्वारे अंजनीच्या पोटी अवतार घेण्याचा निश्चय केला आहे. आता तर तुझ्या मनात कोणती चिंता राहिली नाही ना ?' हे ऐकून भगवती सती प्रसन्न झाली.

देवराज इंद्राच्या अमरावतीमध्ये पुंजिकस्थला नावाची एक अप्सरा होती. एके दिवशी तिच्याकडून काही असा अपराध घडला की, ज्यामुळे

तिला पृथ्वीवर वानरी होऊन जन्माला यावे लागले. खूप प्रार्थना केल्यावर शाप देणाऱ्या ऋषीने एवढा अनुग्रह केला की, तिला जेव्हा जसे पाहिजे तसे रूप घेता यावे. तिने वाटल्यास वानरी राहावे, वाटल्यास मानवी स्त्री व्हावे. वानरराज केसरीने तिचा पत्नी म्हणून स्वीकार केला होता. ती फार सुंदर होती आणि केसरी तिच्यावर फारच प्रेम करीत होता.

एके दिवशी ते दोघेही मानवाचे रूप धारण करून आपल्या राज्यात सुमेरू पर्वताच्या शिखरावर फिरत होते. मंदमंद वारा वाहात होता. वायूच्या एका छोट्याशा झुळकीने अंजनीच्या साडीचा पदर उडाला. अंजनीला त्यावेळी असा भास झाला की, तिला कोणीतरी स्पर्श करीत आहे. ती आपले वस्त्र सांभाळत बाजूला उभी राहिली. तिने रागावून म्हटले- 'असा कोण उद्धट आहे, जो माझे पातिव्रत्य नष्ट करू इच्छितो. माझे इष्टदेव-पतिदेव- माझ्यासमोर उपस्थित आहेत आणि कोणीतरी माझा व्रतभंग करू इच्छित आहे. मी आताच त्याला शाप देऊन भस्म करून टाकते.' त्यावेळी तिला असे भासले की, जणू वायुदेव म्हणत आहेत - 'देवी ! मी तुझे व्रत नष्ट केले नाही. देवी ! तुला असा एक पुत्र होईल की जो शक्तीने माझ्यासारखा असेल. बल आणि बुद्धीने त्याची बरोबरी कोणीही करू शकणार नाही. मी त्याचे रक्षण करीन. तो भगवंताचा सेवक होईल.' त्यानंतर अंजनी आणि केसरी आपल्या निवासस्थानावर निघून गेले. भगवान शंकरांनी अंशरूपाने अंजनीच्या कानाद्वारे तिच्या गर्भात प्रवेश केला.*



चैत्री पौर्णिमेला मंगळवारी** अंजनीच्या उदरी भगवान शंकरांनी

---

* जेहि सरीर रति राम सों सोइ आदरहिं सुजान।
रुद्रदेह तजि नेह बस बानर भे हनुमान॥
जानि राम सेवा सरस समुझि करब अनुमान।
पुरुषा ते सेवक भए हर ते भे हनुमान॥
(दोहावली १४२-१४३)

** काही लोकांच्या मते हनुमान-जयंती कार्तिक कृष्ण १४ किंवा कार्तिक शुक्ल १५ आहे.

वानररूपाने अवतार धारण केला. अंजनी आणि केसरी यांच्या आनंदाला पारावार राहिला नाही. शुक्लपक्षातील चंद्राप्रमाणे प्रत्येक दिवशी वाढत असलेल्या बालकाचे पालनपोषण फारच काळजीपूर्वक होऊ लागले. अंजनी कोठेही गेली तरी बालकास छातीशी धरीत असे, तर केसरी बालकाला आपल्या पाठीवर बसवून उड्या मारी आणि बालक आनंदित झालेला पाहून स्वत: आनंदमग्न होत असे.

एके दिवशी बालकाला घरी सोडून अंजनी कुठेतरी फुले-फळे आणण्यासाठी निघून गेली. केसरी तत्पूर्वीच बाहेर गेलेला होता. बालक घरी एकटाच होता आणि त्याला भूक लागली होती. त्याने तिकडे पाहिले. परंतु त्याला कोणताही पदार्थ मिळाला नाही. शेवटी त्याची दृष्टी सूर्यावर पडली. प्रात:कालची वेळ होती. त्याने विचार केला की, 'हे तर फारच सुंदर लाल लाल फळ आहे. हे खाण्यासाठी आणि खेळण्यासाठी दोन्ही गोष्टींना उपयोगी आहे.' बालकाने सूर्यापर्यंत पोहोचण्याचा प्रयत्न केला. वायूने त्याला उडण्याची शक्ती दिली होती अथवा असेही म्हणता येणे शक्य आहे की, भगवान शंकरांच्या या लीलेमध्ये आश्चर्य ते कोणते ?

तो बालक आकाशात उडू लागला. देवता, दानव, यक्ष इत्यादी त्याला पाहून आश्चर्यचकित झाले. वायूच्या मनातही शंका आली की, माझा हा लहानसा बालक सूर्याकडे धावत आहे. माध्याह्नकालाच्या सतेज प्रखर किरणांनी त्याला एखाद्या वेळी कोठे भाजू नये, म्हणून हिमालय आणि मलयगिरी यांच्याकडून शीतलता घेऊन तो आपल्या पुत्राच्या पाठीमागून चालू लागला. सूर्यनेही पाहिले. त्याच्या दिव्य दृष्टीत बालकाची महानता लपून राहिली नाही. त्याच्या मनात अनेक विचार आले. स्वत: भगवान शंकरच वानर-बालकाच्या रूपात माझ्याजवळ येत आहेत, असे त्याने पाहिले. ही गोष्टही त्याच्यापासून लपून राहिली नाही की, माझ्या पितृतुल्य वायुदेवाच्या आशीर्वादानेच या बालकाचा जन्म झाला आहे आणि तो स्वत: त्याचे रक्षण करण्यासाठी येत आहे. त्याने आपले कररूपी किरण शीतल करून टाकले. जणू तो आपल्या कोमल हातांनी स्पर्श करून आपल्या लहान भावास कुरवाळीत आहे.अथवा जगत्पिता अशा

शंकरांना आपल्याकडे येत असलेले पाहून त्यांचे स्वागत करत आहे. तो बालक सूर्याच्या रथावर पोहोचला. त्याच्याबरोबर खेळू लागला.

त्या दिवशी होते ग्रहण. आपली वेळ झाली आहे, असे समजून राहू सूर्याला ग्रासण्यासाठी आला. एक वानर-बालक सूर्याच्या रथावर बसलेले आहे, असे त्याने पाहिले. प्रथम तर राहूने दखलच घेतली नाही. नेहमीप्रमाणे तो सूर्यावर तुटून पडला. परंतु जेव्हा बालकाच्या कठोर हातांनी तो पकडला गेला, तेव्हा तो भयभीत झाला आणि कसेतरी करून स्वत:ला सोडवून घेऊन पळाला. तो सरळ देवराज इंद्राकडे गेला. त्याने तेथे जाऊन इंद्राला म्हटले, 'देवराज ! आपण सूर्याला ग्रासण्याचा अधिकार मला दिला आहे. आता आपण हा अधिकार आणखी कोणा दुसऱ्यालाही दिला आहे काय?' इंद्राच्या लक्षात ही गोष्ट आली नाही. तो राहूवर रागावला आणि त्याने त्याला पुन्हा सूर्याकडे पाठवले. दुसऱ्या वेळी राहू तेथे आल्यावर बालकाला आपल्या भुकेची आठवण झाली. त्याने विचार केला की, ही खाण्यास चांगली वस्तू आहे. बस्स. तो राहूवर तुटून पडला. राहू त्या बालकाच्या तेजाला पाहून भ्याला आणि आपल्या रक्षणासाठी इंद्राचा धावा करू लागला. इंद्र ऐरावतावर स्वार होऊन त्याच्या रक्षणासाठी धावला. ऐरावताला पाहताच बालकाने राहूला सोडून दिले आणि हे एक उत्तम फळ आहे, असे समजून ऐरावताला पकडण्यासाठी बालक धावला. त्यावेळी इंद्राने घाबरून बालकावर आपले वज्र फेकले. त्यामुळे बालकाची डावी हनुवटी तुटून गेली. बालक घायाळ होऊन पर्वतावर कोसळले आणि तडफडू लागले.

वायुदेवाने बालकाला उचलून गुहेमध्ये नेले. तो इंद्रावर भयंकर रागावला. त्याने आपली गती बंद करून टाकली. वायू बंद झाल्यामुळे सर्व प्राणी लाकडासारखे जड झाले. त्रैलोक्यात कोणीही हालचाल करू शकत नव्हते. सर्वांचे श्वास बंद झाले. देव घाबरले. इंद्र धावतच ब्रम्हदेवाकडे गेला. त्याच क्षणी ब्रम्हदेव त्या पर्वताच्या गुहेमध्ये आला आणि त्याने आपल्या हाताने बालकाला स्पर्श करून त्याला जिवंत केले. बालक प्रसन्न होऊन उठून उभा राहिला. मग वायुदेवाला फार आनंद

झाला आणि त्याने सर्व जगात प्राण-संचार सुरू केला. ब्रम्हदेवाने देवतांना म्हटले, ' हा बालक सामान्य नाही. हा देवांचे कार्य साधण्यासाठी प्रकट झाला आहे. म्हणून सर्व देवांनी याला वर देणेच योग्य ठरेल.' इंद्र म्हणाला, 'माझ्या वज्राद्वारे याची हनुवटी तुटली गेली आहे, म्हणून आजपासून याचे नाव हनुमान राहील आणि मी त्याला असा वर देतो की, माझ्या वज्राने हनुमानाचा कधीच केसही वाकडा होणार नाही.' सूर्यदेव म्हणाला, 'मी माझे एक शतांश तेज याला प्रदान करतो. माझ्या शक्तीने हा आपले रूप बदलू शकेल आणि जेव्हा याला शास्त्रांचे अध्ययन करण्याची इच्छा होईल, तेव्हा मी त्याला संपूर्ण शास्त्रांचे अध्ययन करवीन. हा फार मोठा वक्ता होईल.' वरुणाने आपल्या पाशापासून आणि जलापासून निर्भय होण्याचा वर दिला. कुबेर इत्यादी देवगणांनीही आपापल्याकडून हनुमंताला निर्भय केले. विश्वकर्म्याने आपण बनविलेल्या दिव्य अस्त्रांनी अवध्य होण्याचा वर दिला आणि ब्रह्मदेवाने त्याला ब्रह्मज्ञान प्रदान केले आणि चिरंजीव केले. त्याचबरोबर ब्रह्मास्त्र व ब्रह्मपाश यांपासूनही मुक्त केले.

परत जाता जाता ब्रह्मदेवाने वायुदेवास सांगितले- 'तुमचा पुत्र फारच मोठा वीर, इच्छेनुसार रूप धारण करणारा आणि मनासारखा तीव्र वेगाने गमन करणारा होईल. याची गती विघ्नरहित असेल, याची कीर्ती अमर राहील आणि राम-रावण युद्धात हा रामाचा सहाय्यक तसेच त्यांना परम प्रिय होईल.' अशाप्रकारे हनुमानास वर देऊन सर्व देवगण आपापल्या स्थानी निघून गेले. अंजनी आणि केसरी यांना जेव्हा ही हकीकत समजली, तेव्हा त्यांना जो आनंद झाला, तो सर्वथा अवर्णनीय आहे.

लहानपणी हनुमान फार खोडकर होता. एक तर ते वानर, दुसरे लहान वय आणि तिसरे देवतांकडून मिळालेले एवढे मोठे बाळ. रुद्राचा अंश तर होताच. तो ऋषींची आसने उचलून झाडावर टांगून ठेवी. त्यांच्या कमंडलूमधील पाणी सांडून टाकी. त्यांच्या लंगोट्या फाडून टाकी. कधी कधी कोणाच्या मांडीवर बसून खेळे. एकाएकी त्यांची दाढी उपटून पळायचा. त्याला कोणी स्वतःच्या बळाने आवरू शकतच नव्हता. सर्वजण त्याच्यापुढे असमर्थ होते. मोठा याला [illegible]

चंचलता जशीच्या तशीच राहिली. अंजनी आणि केसरी फार काळजी करू लागले. त्यांच्याकडून जे शक्य होते, ते ते उपाय त्यांनी केले. परंतु हनुमान काही वळणावर आला नाही. त्यांनी ऋषींना प्रार्थना केली, ''आपण कृपा केली तरच हा बालक सुधारू शकेल.'' ऋषींनी विचार करून असा निश्चय केला की, याला आपल्या शक्तीचा फार अभिमान आहे. जर हा आपले बळ विसरेल तर काम होईल. त्यांनी हनुमंताला शाप दिला,' तू आपली शक्ती विसरून जा. जेव्हा कोणी तुला तुझ्या कीर्तीचे स्मरण करून देईल, तेव्हा तू आपल्या बलाचे स्मरण करून पुन्हा असाच बलवान होशील.' हनुमान आपले बल विसरून गेला.

आता त्याच्या विद्याध्ययनाचा काल आला. वानरराज केसरीने योग्य ते संस्कार करून वेदाध्ययनासाठी त्याला सूर्यदेवाकडे पाठविले. तेथे जाऊन हनुमंताने संपूर्ण वेद-वेदांगांचे अध्ययन केले. त्याला खरे तर अध्ययन करण्याची आवश्यकताच नव्हती. कारण तो साक्षात शंकर होता. परंतु संप्रदाय-परंपरेचे रक्षण करण्यासाठी त्याने संपूर्ण विद्यांचे अध्ययन केले. थोड्याच दिवसात तो आपल्या माता-पित्याजवळ परतला. सूर्यदेवाच्या कृपेने आपला मुलगा सर्व विद्यांत पारंगत झाल्याचे पाहून माता-पित्यांना फार आनंद झाला.



भगवान राम अवतीर्ण झाले होते. भगवान शंकर त्यांच्या बाललीलांचे दर्शन करण्यासाठी कित्येकदा अयोध्येत येत आणि तेथेच राहात असत. ते कधी ज्योतिषी होऊन भगवंतांचा हात पाहात, तर कधी भिक्षुक होऊन त्यांना आशीर्वाद देत. जेव्हा भगवान राम खेळण्यासाठी राजमहालाच्या बाहेर येऊ लागले, त्यावेळी एके दिवशी तेथे एक माकडवाला आला. त्याच्याबरोबर एक फार सुंदर नाचणारे वानर होते. माकडवाला डमरू वाजवीत राजमहालाच्या फाटकाजवळ आला. तेथे पुष्कळशी मुले एकत्र जमली. भगवान राम देखील आपल्या भावांसह तेथे आले. हे वानर सामान्य वानर थोडेच होते ? हे तर आपल्या इष्टदेवाचे मनोरंजन करण्यासाठीच हनुमानरूपात प्रगट झालेले स्वतः शिव-शंकरच होते. नाचणारेही तेच आणि

नाचविणारेही तेच ! हे सर्व कशासाठी ? तर केवळ आपल्या प्रभूंची लीला पाहण्यासाठी, त्यांच्याबरोबर खेळण्यासाठी आणि त्यांच्या प्रसन्नतेसाठी !

शेवटी भगवान राम प्रसन्न झाले. वानराचा नाच पाहून सर्व लोक परत जाऊ लागले, पण भगवान राम हट्ट धरून बसले. ते म्हणाले की, 'मला हे वानर हवे.' राजकुमाराचा हट्ट कसा टाळला जाईल बरे ? दशरथ महाराजांनी आज्ञा दिली, 'वानराच्या मोबदल्यात माकडवाला जेवढे मागेल तेवढे पैसे घेऊ द्या; पण वानर माझ्या शामसुंदराला द्यावे.' माकडवाला धनासाठी आला नव्हता. तो तर स्वत:ला प्रभुचरणी समर्पित करण्यासाठी आला होता. भगवान रामांनी स्वत: आपल्या हातांनी वानराला धरले. आतापर्यंत तर ते आपल्या स्वत:लाच नाचवीत होते. आता नाचविणारे होते भगवान राम आणि नाचणारे स्वत: सदाशिव! युगा-युगांतराची अभिलाषा पूर्ण झाली. ते आनंदाच्या अतिरेकाने नाचू लागले. सर्वजण त्या वानराचा नाच पाहण्यात तन्मय झाले आणि माकडवाला गुप्त झाला. त्या माकडवाल्याने वानरातच प्रवेश केला अथवा आपले काम पूर्ण झाल्याने तो कैलासाला परत गेला, हे समजले नाही.

या रूपात हनुमान पुष्कळ दिवस भगवान रामांची सेवा आणि मनोरंजन करीत राहिला. जेव्हा विश्वामित्र राम आणि लक्ष्मणाला घेऊन जाण्यासाठी आले, तेव्हा भगवान रामांनी त्याला एकांतात बोलावून सांगितले की, 'हनुमाना ! तू माझा अंतरंग सखा आहेस. माझी कोणतीही लीला तुझ्या-पासून लपून राहिलेली नाही. कालांतराने मी रावणाला मारीन. त्यावेळी मला वानरांची आवश्यकता वाटेल. रावणाने वालीला आपल्या पक्षात घेतले आहे. खर, दूषण, त्रिशिरा, शूर्पणखा दंडकवनात आहेत. मारीच, सुबाहू, ताडका आमच्या शेजारीच आहेत. त्यांचे जाळे चहूकडे पसरले आहे. तू शबरीला भेटून ऋष्यमूक पर्वतावर जा आणि तेथे सुग्रीवाशी मैत्री कर. मी हळू हळू रस्ता निर्विघ्न करीत तिकडे येईन, तेव्हा तू मला सुग्रीवाची भेट घालून दे आणि वानरसेना एकत्र जमव. मग रावणाला मारून अवतारकार्य पूर्ण केले जाईल.'

भगवंताला सोडून जाण्याची इच्छा नसतानाही हनुमंताने भगवंताची आज्ञा शिरोधार्य मानली आणि प्रभूचे नामस्मरण करीत त्याने ऋष्यमूक पर्वताकडे प्रस्थान केले.



(२)

त्याकाळी वालीच्या भयाने भयभीत होऊन सुग्रीव आपल्या मंत्र्यांबरोबर ऋष्यमूक पर्वतावर राहात होता. हनुमंतही त्याच्याबरोबर होता. सुग्रीवाला नेहमी भीती वाटत असे की, वालीकडून पाठविला गेलेला त्याचा कोणी मित्र येऊन आपल्यावर आक्रमण तर करणार नाही ना ? कारण शापामुळे वाली तेथे येऊ शकत नव्हता. एके दिवशी सुग्रीव मंत्री आणि आपला प्रिय सखा हनुमान यांच्याबरोबर बसून काही राजकीय चर्चा करीत होता. एकाएकी त्याची दृष्टी पंपासरोवरावर गेली. त्याने पाहिले की, त्या ठिकाणी दोन सशस्त्र व्यक्ती उभ्या आहेत. त्यांचा उद्देश काय आहे, हे नीट समजत नव्हते. परंतु ते कोणाच्या तरी शोधात आहेत असे वाटले. त्यांची हालचाल, वीरोचित शरीर, त्यांची शस्त्र-अस्त्रे, त्याच बरोबर त्यांची वल्कल-वस्त्रे आणि जटा पाहून सुग्रीवाला मोठी शंका आली. तो हनुमंताला म्हणाला, ''हे मित्रा ! हे दोन वीर पुरुष कोण आहेत, याचा शोध घे. जर ते शत्रुपक्षाचे असतील, तर येथून पळून जायला पाहिजे आणि जर तटस्थ असतील व त्यांना कसल्याही मदतीची आवश्यकता असेल, तर त्यांच्याशी मित्रता करून आपण एक-दुसऱ्याच्या इष्टसिद्धीमध्ये सहायक झाले पाहिजे. तू ब्रह्मचाऱ्याचा वेष धारण करून त्यांचा शोध लाव. मग जे असेल, ते मला इशाऱ्याने कळव.'' हनुमंताने त्याची आज्ञा मानली.

सुग्रीवाच्या सांगण्यावरून हनुमान ब्राम्हणाचा वेष धारण करून त्यांच्याकडे गेला. योग्य त्या शिष्टाचारानंतर त्याने त्या दोघांची प्रशंसा करीत त्यांचा परिचय विचारला. तो म्हणाला-'आपली शस्त्रास्त्रे आणि शरीराची ठेवण वीरासारखी पाहून असे वाटते की, आपण वीर पुरुष आहात. आपल्या कोमल चरणकमलांकडे पाहून असे वाटते की, आपण राजमहालात राहणारे आहात. आपणाला कधी अरण्यात अथवा पर्वतावर राहण्याचा

प्रसंग आलेला नाही. आपल्या वेषावरून आपण ऋषिकुमार आहात, असेच म्हणता येईल. परंतु काहीच निश्चित सांगता येत नाही. आपल्या चेहऱ्यावरील तेज पाहून वाटते की, आपण सामान्य पुरुष नाही, अलौकिक आहात. आपण तिन्ही देवतांपैकी कोणी आहात की काय ? आपण साक्षात नर-नारायण तर नाहीत ना ? माझ्या मनाला मोठी शंका वाटते. आपल्यात फार मोठे आकर्षण असल्याचे लक्षात येत आहे. आपल्या सौंदर्याकडे आणि माधुर्याकडे पाहून माझे चित्त मोहित होत आहे. आपण माझे अत्यंत आत्मीय वाटत आहात. मी कधी काळी आपल्याबरोबर राहिलो आहे, असे माझे मन मला पुन्हा पुन्हा सांगत आहे.तरी आपण कृपा करून माझा संदेह दूर करा.'

भगवान राम स्मित हास्य करीत हनुमंताचे वचन ऐकत होते. त्यांनी लक्ष्मणाकडे पाहून म्हटले- 'हा ब्राम्हण फार बुद्धिमान आहे. याच्या बोलण्यावरून असे वाटते की, याने सांगोपांग वेदांचे अध्ययन केले आहे. याच्या बोलण्यात एकही शब्द अशुद्ध आला नाही. याच्या आकृतीवरून असे कोणतेच लक्षण प्रगट झाले नाही की, ज्यामुळे त्याचा भाव दूषित म्हणता येईल. हा तर एखाद्या राजाचा मंत्री होण्यास योग्य आहे. याची उच्चारणशैली आणि नीतिमत्ता दोन्हीही गंभीर आणि प्रभावदर्शक आहेत.' रामाच्या इशाऱ्यावरून लक्ष्मण म्हणाला-'ब्राह्मणदेव ! आम्ही अयोध्यानरेश दशरथ महाराजांचे पुत्र आहोत. त्यांची आज्ञा मानून चौदा वर्षांसाठी वनात आलो आहोत. येथे कोण्या एका राक्षसाने जनककन्या सीतेचे अपहरण केले आहे. आम्ही तिचाच शोध घेत इकडे फिरत आहोत. आता तुम्ही आपली ओळख सांगा.'

लक्ष्मणाचे बोलणे संपते न संपते तोच हनुमंताचे रूप बदलले. त्याने वानराच्या रूपाने भगवंताच्या चरणावर लोळण घेतली. त्यावेळी त्याचे मन म्हणत होते, 'मी भगवंतासमोर दुसरा वेष धारण करून आलो, त्यामुळे त्यांच्याशी मी एक प्रकारचे कपट केले, म्हणून ते माझ्याशी बोललेसुद्धा नाहीत. मी त्यांना ओळखले नाही, म्हणून त्यांनीही मला ओळखले नाही. मी त्यांना परिचय विचारला, तर त्यांनीही माझा परिचय विचारला. हे

सर्व माझ्या कूटनीतीचे फळे आहे. मी अपराधी आहे,' असा विचार करीत असता त्याच्या डोळ्यांतून अश्रुधारा वाहू लागल्या. तो भगवंताच्या चरणांवर गडबडा लोळू लागला. भगवंताने त्याला बळेच उचलून छातीशी धरले.

हनुमंत म्हणाला- 'प्रभो, मी वानर आहे. साधारण जीव आहे. मी आपणांस विसरावे, आपल्यासमोर मी अपराध करावा, हे स्वाभाविक आहे. परंतु आपण मला कसे विसरलात ? मी तर आपल्या आज्ञेनुसार सुग्रीवाजवळ राहून फार दिवसांपासून आपली वाट पाहात आहे. सुग्रीवदेखील फारच दुःखी आहे. मी त्याला आपला परिचय देऊन धीर दिला आहे. त्याला आता केवळ आपलाच आधार आहे. आता आपण चला आणि त्याचा स्वीकार करा. त्याचे संकट दूर करून त्याच्याकडून सेवा घ्या.' हनुमंताने आनंदित होऊन त्या दोन्ही भावांना आपल्या दोन्ही खांद्यांवर बसवून घेतले आणि त्यांना तो सुग्रीवाजवळ घेऊन गेला.

राम आणि सुग्रीवाची मैत्री झाली. त्यांनी अग्नीला साक्षी ठेवून मैत्रीचा संबंध स्थापित केला. वाली मारला गेला आणि सुग्रीव वानरांचा राजा झाला. चातुर्मासात राम आणि लक्ष्मण प्रवर्षण पर्वतावर राहिले. सुग्रीव भोगविलासात आसक्त होऊन प्रभू रामाचे काम विसरून गेला. परंतु हनुमान कसा विसरणार ? त्याने अनेक वेळा सुग्रीवाला समजावून सांगण्याचा प्रयत्न केला. परंतु सुग्रीवाने ऐकून न ऐकल्यासारखे केले. तो आपल्या कामात बुडून गेला. सुग्रीव उपेक्षा करीत आहे असे जेव्हा लक्ष्मणाने पाहिले, तेव्हा तो फार रागावला.आता तारा सुग्रीवाला समजावून सांगत होती, तेवढ्यात हनुमंताने बोलाविलेली वानर-अस्वलांची अपार सेना येऊन पोहोचली. हे दृश्य पाहून लक्ष्मण सुग्रीवावर प्रसन्न झाला. सुग्रीव भगवान रामाजवळ आला आणि त्याने आपल्याकडून झालेल्या प्रमादाबद्दल क्षमा मागितली. भगवान रामासमोर निरनिराळ्या देशांचे वर्णन करून सुग्रीव सीतेच्या शोधासाठी वानर-सेना पाठवू लागला. सीतेच्यासंबंधी एवढेच माहीत होते की, रावण तिला दक्षिण दिशेकडे घेऊन गेला आहे. परंतु वानरांना चोहीकडे पाठविण्यामागे हेतू असा होता की, सर्व वानर एकत्र व्हावेत. तसेच जर

रावणाने सीतेला कुठे अन्यत्र ठेवले असेल, तर त्याचाही पत्ता लागावा. सुग्रीवाने सर्वांना आज्ञा केली, 'जो एक महिन्यात सांगितलेल्या स्थानांची माहिती घेऊन येणार नाही, त्याला मी फार कठोर शिक्षा करीन.' सर्वांनी सांगितलेल्या दिशेने प्रस्थान केले.

दक्षिण दिशेकडे शोधण्याचे काम अत्यंत महत्त्वाचे होते. म्हणून हे काम प्रमुख वानरवीरांकडेच सोपविले होते. जाम्बवान, हनुमान, अंगद, नल, नील, इत्यादींना बोलावून त्यांच्या कामाचे महत्त्व समजावून सांगितले. सुग्रीवाच्या मनात त्यावेळी असा भाव आला की, हे वीर आपले काम निश्चितच पूर्ण करतील. विशेष म्हणजे हनुमंताला तर कोणतेही काम अशक्य नाहीच. त्याने मोठ्या आनंदाने आणि प्रेमाने हनुमंताला म्हटले- 'हनुमंता ! तुझी पाण्यात, पृथ्वीवर आणि आकाशात एकसारखीच गती आहे. स्वर्ग किंवा आकाशातही असा कोणी नाही की, जो तुझी गती रोखू शकेल. तू आपल्या पित्यासारखाच गती, वेग, तेज आणि स्फूर्ती यांनी युक्त आहेस. तू सर्व काही जाणतोसच. तुला आणखी काय सांगू? तुझे काम केवळ अनेक ठिकाणी पाहून येणे एवढेच नाही, तर सीतेला मिळवणे हे आहे. माझा तुझ्यावर पूर्ण विश्वास आहे की, तू सीतेचा शोध घेऊनच परत येशील.'

सुग्रीवाचे वचन ऐकून भगवान रामांनी हनुमंताला बोलावले. भगवंतांना पूर्वीपासूनच ठाऊक होते. परंतु सुग्रीवाच्या बोलण्याने त्यांना आठवण झाली. त्यांनी हनुमंताला म्हटले- 'हनुमंता ! तू माझे कार्य अवश्य पूर्ण करशील. ही माझी आंगठी घेऊन जा. ही पाहून सीतेला खात्री पटेल की, तू रामाचा दूत आहेस.' सीतेला सांगण्यासाठी त्यांनी काही निरोपदेखील दिला. हनुमान वगैरे वानर भगवंतांच्या चरणांचे वंदन करून तेथून निघाले.



हनुमान, जाम्बवान, अंगद इत्यादी शोध घेता घेता थकून गेले. तहानभुकेने व्याकुळ झाले. पाण्याचा कुठेच पत्ता नाही. कित्येक दिवसांपासून फळांचे दर्शन झाले नाही. सर्व जबाबदारी हनुमंतावर येऊन पडली. त्या

भीषण पर्वताच्या एका शिखरावर चढून त्याने पाहिले, तर जवळच त्यांना हिरवळ दिसली. काही सुंदर पक्षी आपल्या पंखांवरील पाणी उडवीत येत असलेले त्यांना दिसले. त्यावरून येथे एखादा सुंदर बगीचा आणि सरोवर असावे असा अंदाज आला.सर्वांना घेऊन तो तिकडेच गेला. तेथे गेल्यानंतर कळले की एका गुहेतूनच हे सर्व निघत आहे. एक दुसऱ्याचा हात धरून भगवान रामांचे स्मरण करीत ते गुहेत शिरले. गुहा फारच सुंदर होती. तेथील झऱ्यातून अमृतासारखे पाणी वहात होते. सोन्यासारखे वृक्ष होते आणि त्यांना स्वादिष्ट फळे लागलेली होती. तेथील तपस्विनीची अनुमती घेऊन सर्वजण खाऊन पिऊन तृप्त झाले.

त्या तपस्विनीने विचारल्यावर हनुमंताने सर्व वृत्तांत सांगितला आणि अशी इच्छा व्यक्त केली की, आम्ही येथून लवकरच निघून जावे, हे बरे. ती तपस्विनी म्हणाली- 'मित्रा ! येथे आल्यावर पुन्हा कोणीही जिवंत परत जात नाही. हे विघ्नरहित तपश्चर्या करण्याचे स्थान आहे. जर लोक येथून जाऊ लागले, तर येथील तपात विघ्न येईल. परंतु तू मला भगवान रामाची कथा सांगितली आहेस. म्हणून तुम्हा लोकांना तपश्चर्येच्या बळावर मी येथून बाहेर घेऊन जाते. मलाही भगवान रामांच्या दर्शनासाठी प्रवर्षण पर्वतावर जावयाचे आहे. बरे ! आता तुम्ही सर्वजण आपले डोळे मिटून घ्या.' वानर-अस्वलांनी आपापल्या हातांनी आपापले डोळे झाकून घेतले. एका क्षणातच त्यांना कळून आले की, आपण सर्वजण समुद्राच्या काठी एका उंच पर्वतावर उभे आहोत. हनुमंताची अनुमती घेऊन ती तपस्विनी भगवान रामांच्या दर्शनासाठी निघून गेली.



अंगद म्हणाला-'मित्रांनो, आता एक महिना निघून गेला. आपण सीतेचा शोध लावू शकलो नाही अथवा जेथे जेथे जायला पाहिजे होते. तेथे तेथे जाऊही शकलो नाही.आता परत गेल्यावर सुग्रीव मला नक्की मारून टाकील. म्हणून मी आता येथे राहून तपश्चर्या करतो. तुम्ही जा.' हनुमंत म्हणाला, 'युवराज, अवेळीच धैर्य का सोडता ? सुग्रीवाचे तुमच्यावर

फार प्रेम आहे.तुम्ही आपले प्राण पणास लावून रामाचे कार्य सिद्ध होण्यासाठी प्रयत्न करीत आहात. गुहेत गेल्यामुळे आपणाला उशीर झाला आहे. ते नक्की क्षमा करतील आणि तुम्हांला राजा करतील. तरी तुम्ही घाबरू नका. भगवान राम फार दयाळू आहेत. ते आपले सर्वप्रकारे रक्षण करतील. चला, आपण आपल्या शक्तीनुसार त्यांची आज्ञा पालन तर करूया. जर तुम्हांला सुग्रीवाविषयी द्वेष वाटत असेल, तो राजा झाल्यामुळे तुम्हांला दु:ख झाले असेल आणि येथे राहून आपले प्राण वाचवू इच्छित असाल, तर हे कधीही शक्य होणार नाही. तुम्ही रामाचे काम चुकवून कोठेही लपलात, तरी लक्ष्मणाच्या बाणांपासून वाचू शकणार नाही. त्यांचे काम न झाल्यामुळे जर वाचूच शकत नाही, तर त्यांच्याकडे जाणेच चांगले. जसे ते करतील तसे होईल.' हनुमंताचे वचन ऐकून अंगदाने जिवंत राहण्याचा संकल्प तर सोडला; परंतु त्याने सुग्रीवाजवळ जाण्यापेक्षा तेथेच उपोषण करून प्राणत्याग करणे योग्य मानले. त्याच्याबरोबर सर्वच उपोषण करू लागले. रामाविषयी संभाषण होऊ लागले.

त्याच वेळी सम्पातीचे दर्शन झाले. त्याच्याकडून सीतेचा पत्ता लागला. सर्व वानरे-अस्वले समुद्रतटावर एकत्र झाली. समुद्र कोण पार करू शकेल, याचा विचार होऊ लागला. अंगदाच्या अत्यंत ओजस्वी भाषणानंतर प्रत्येकाने आपापल्या शक्तीची कुवत सांगितली आणि समुद्र पार करण्यास असमर्थता दर्शविली. अंगदानेही म्हटले, 'मी कसा तरी पलीकडे तर जाऊ शकेन; परंतु परत येऊ शकेन की नाही हे सांगता येत नाही.' जाम्बवंताने त्याला युवराज म्हणून संबोधित केले आणि त्याला जाण्यास मनाई केली. त्याने स्वत:ही आपल्या वृद्ध अवस्थेमुळे जाण्यास असमर्थता प्रगट केली. आतापर्यंत हनुमान चूप बसला होता. तो एका कोपऱ्यात बसल्या बसल्या सर्वांचे बोलणे ऐकत होता. अंगद निराश झाला होता. सीतेचा पत्ता माहीत झाला, तेव्हा वानरांना जो आनंद झाला होता, तो आता मावळून गेला होता. जाम्बवंताने अंगदाला संबोधून म्हटले, 'युवराज ! निराश होण्याचे काही कारण नाही. समुद्र पार करण्यासाठी केवळ सामर्थ्याची आवश्यकता नाही, तर विशाल बुद्धीचीही आवश्यकता

आहे. या कार्यासाठी भगवान शंकरांनी अवतार घेतला आहे. राक्षसांचा संहार नक्की होणार आहे.' त्याने हनुमंताकडे पाहून म्हटले, 'हनुमाना ! तू का गप्प बसलास ? तुझा जन्मच रामकार्यासाठी झाला आहे. वायुनंदना ! तू आपल्या पित्यासारखा क्षणात समुद्र पार करू शकतोस. तुझी बुद्धी अप्रतिम आहे. तू विवेक आणि ज्ञानाचे भांडार आहेस. एवढे सामर्थ्य तुझ्यात असताना तू गप्प कसा ?' जाम्बवानाने हनुमंताचा जन्म, देवतांचे वरदान आणि ऋषींच्या शापाची कथा सांगितली आणि तो वाटेल ते करू शकेल, याची आठवण करून दिली.

हनुमान नेहमी भगवंताच्या नामस्मरणातच तन्मय राहात असे. त्याला स्वत:ची अथवा आपल्या सामर्थ्याची आठवणच नव्हती. जाम्बवानाचे वचन ऐकताच आपल्यामध्ये अपार शक्ती आहे, याची त्याला आठवण झाली. माझ्यावर भगवंतांची अपार कृपा आहे आणि भगवंतांची सर्व शक्ती ही माझी शक्ती आहे. त्याचे शरीर वाढत वाढत सुमेरू पर्वताएवढे झाले. त्याने गर्जना करीत म्हटले, ' या समुद्राची काय कथा ? भगवंतांच्या कृपेने मी असे शेकडो समुद्र ओलांडू शकेन.मला जर सीता माता लंकेत मिळाली नाही, तर मी स्वर्गापासून ब्रम्हलोकापर्यंत सर्व ठिकाणी शोध घेईन. लंकेसह त्रिकूट पर्वत उपटून आणीन, रावणाला ठार करीन. श्रीरामांचे कार्य करताना माझ्या मार्गात अडथळा करू शकेल, अशी कोणतीच शक्ती नाही.' हनुमंताची गर्जना ऐकून सर्व वानरसेना हर्षध्वनी करू लागली. जाम्बवान म्हणाला, 'हनुमान, तू सर्व काही करू शकतोस. परंतु यावेळी हे सर्व करण्याची आवश्यकता नाही. तू केवळ सीतेला पाहून ये. भगवान रामाबरोबर आपण सर्व लंकेस जाऊ, भगवंतांच्या बाणांनी राक्षसांचा उद्धार होईल, रामाची कीर्ती होईल आणि आपण सर्व आनंदोत्सव साजरा करू.' जाम्बवानाचे वचन ऐकताच हनुमान उडी मारून एक उंच पर्वताच्या शिखरावर चढला. त्याच्या पायांच्या तडाख्यांनी मोठमोठी पर्वतांची शिखरे तुटून पडू लागली. त्याच्या शेपटीच्या तडाख्याने मोठमोठे वृक्ष आकाशात उडू लागले. त्यांची फुले तुटून हनुमंतावर अशी पडत होती की, जणू काही ते त्याची पूजा करीत आहेत. देवगणांनी जयजयकार केला. ऋषींनी

शांतिपाठ केला. वायूने सहाय्यता केली. समुद्र पार करण्यासाठी हनुमानाने उडी मारली. त्याने भगवंताचे स्मरण करून वानरांना आश्वासन दिले, 'माझे मन फार उत्साहित आहे, मला फार मोठा आनंद वाटत आहे. भगवंताच्या अपार कृपेचा अनुभव येत आहे.मी हे काम पूर्ण करून लवकरच परत येईन. तुम्ही घाबरू नका.' असे म्हणून भगवंताच्या नामाचा जयघोष करीत तो निघाला. त्याच्या वेगाच्या प्रभावामुळे पुष्कळसे वृक्ष त्याच्याबरोबर उडू लागले. आकाशातील ढगांचे समुदाय त्याच्या अंगाच्या कठोर स्पर्शाने विखरून शंकरस्वरूप असलेल्या त्याच्या शरीरावर पाण्याचे काही शीतल बिंदू टाकू लागले. श्रीमारुतिराय इकडे तिकडे न पाहता आकाशमार्गाने जाऊ लागले होते.

समुद्राने विचार केला, 'रामाच्या पूर्वजांनीच मला हे रूप दिले आहे. परंतु मी त्यांचे कोणतेही काम केलेले नाही. श्रीरामांच्या मनात असा संशय न येवो की, सीताहरण करण्यात समुद्राचाही हात आहे. कारण रावण एकप्रकारे माझ्यामध्येच राहतो. मीच त्याच्या किल्ल्यांचा खंदक आहे. जर मी त्याच्या दूताचे स्वागत केले, त्याच्या विश्रांतीसाठी एखादा उपाय केला, तर मी या दोषातून मुक्त होण्याची शक्यता आहे.' त्याने मैनाकाला म्हटले, 'मैनाका, रामदूताचे स्वागत करा.' मैनाक मोठे विशाल रूप धारण करून समुद्रातून वर आला. हनुमंताला हे काहीतरी विघ्न आहे, असे वाटले. तो आपल्या पायाच्या प्रहाराने त्याला पाताळात घालणार, एवढ्यात त्याने मानवरूप धारण केले व तो आपल्या शिखरावर उभा राहिला आणि त्याने निवेदन केले, ' हनुमाना, तू मला सहाय्यक असलेल्या वायूचा पुत्र आहेस. जेव्हा इन्द्र आपल्या वज्राद्वारे पर्वतांचे पंख कापून टाकीत होता, तेव्हा मी तुझ्या वडिलांच्या मदतीनेच समुद्रात येऊन घुसलो आणि स्वतःला वाचवू शकलो. मी तुला विश्रांती देऊ इच्छितो. थोडा वेळ थकवा दूर कर व नंतर जा. भगवान रामांचे कार्य म्हणजे साऱ्या जगताचेच कार्य आहे ना ! त्याच्या दूताला मदत करणे म्हणजे साऱ्या जगताला मदत करणे होय. तू माझी विनंती मान्य करशील, अशी अशा

हनुमंताने मोठ्या प्रेमाने आपल्या हातांनी मैनाक पर्वताला स्पर्श केला आणि तो म्हणाला, 'मैनाका, तू माझ्यावर फार प्रेम करतोस. तू माझ्या पित्याप्रमाणे मला वंदनीय आहेस. मला तुझ्या आज्ञेचे पालन केले पाहिजे, परंतु मी यावेळी भगवान रामांच्या कामासाठी जात आहे. माझे अंत:करण त्यांचे काम करण्यासाठी तळमळत आहे. मी विश्रांती घेण्यासाठी जर येथे माझ्या शरीराला थांबवले, तर माझे हृदय शरीराला येथेच सोडून लंकेत पोहोचण्याची शक्यता आहे. यावेळी मी एक क्षणभरही येथे थांबू शकत नाही, मला क्षमा कर.' हनुमान चालता चालता एवढे म्हणून पुढे निघाला.

देवतांनी विचार केला, 'हनुमंतामध्ये सामर्थ्य तर आहे, त्याच्या विद्येचीही बऱ्याच वेळा परीक्षा झाली आहे. परंतु राक्षसांमध्ये जाऊन सुखरूप परत येण्याची बुद्धी याच्यात आहे की नाही, ही गोष्ट जाणून घेतली पाहिजे.' त्यांनी दक्षकन्या, काश्यपपत्नी आणि नागमाता सुरसा हिला हनुमंताच्या परीक्षेसाठी पाठविले. ती येऊन हनुमंताच्या मार्गात उभी राहिली आणि म्हणू लागली, 'आज मला सुदैवाने भोजन मिळाले आहे, मी पोटभर खाईन.' हनुमंताने प्रथम तर तिला हेच म्हटले, 'रामाचे कार्य आहे, ते मला अगोदर करू दे. मग मला खा. मी मरणाला भीत नाही.' परंतु जेव्हा तिने नकार दिला, तेव्हा हनुमंताने तिला तोंड पसरण्यास सांगितले. ती जसजसे तोंड पसरीत होती, तसतसा हनुमान दुप्पट होत गेला. जेव्हा तिने शंभर योजने मुख पसरले, तेव्हा हनुमंत छोटे रूप घेऊन तिच्या मुखात शिरला व बाहेर आला. हनुमंताचे बुद्धिकौशल्य पाहून सुरसा फार प्रसन्न झाली आणि तिने त्याला यशस्वी होण्याचा आशीर्वाद देऊन निरोप दिला.

राहूची माता सिंहिका समुद्रातच राहात होती. आकाशात विहार करणाऱ्यांची सावली पाण्यात पडली की ती त्याला पकडायची आणि त्यामुळे विहार करणारा नाइलाज होऊन पाण्यात पडायचा. अशा प्रकारे तिने अनेकांचा संहार केला होता. हनुमंतावरसुद्धा तिने तोच डाव टाकला. आपली गती थांबल्याचे जाणवल्यामुळे हनुमंताने आपली दृष्टी खाली वळविली आणि त्या राक्षसिणीला ओळखले. ती त्याच्यासमोर काय टिकणार होती ! एका हलक्याशा तडाख्याने ती खलास झाली आणि हनुमान निर्विघ्नपणे समुद्राच्या दुसऱ्या

तटावर पोहोचला. फार सुंदर वन होते. हिरवीगार झाडी, सुगंधित फुले, पक्ष्यांचा मधुर आवाज आणि भुंग्यांचा गुंजारव हे सर्व अनावरपणे मनाला आकर्षित करीत होते. परंतु हनुमंताने त्यांचेकडे पाहिलेसुद्धा नाही. तो उडी मारून एका पर्वताच्या उंच टेकडीवर चढला. त्याने निश्चय केला की, हे स्थान शिबिर करण्यास योग्य आहे. वानरांसाठी येथे फळे-मुळे देखील भरपूर आहेत. गोड पाणीही आहे आणि सर्वांत महत्त्वाची गोष्ट अशी आहे की, येथून संपूर्ण लंका दिसते. हनुमंताने तेथून लंकेतील बऱ्याचशा गोष्टी जाणून घेतल्या. लंका-दुर्ग अवघड आहे, असे अनुमान करून त्यातील प्रत्येक गोष्टीचा बारकावा जाणून घेतला पाहिजे. सीतेचा शोध घेता घेता हे काम करणेदेखील माझे कर्तव्य आहे, असे त्याने ठरविले.

एवढ्या मोठ्या शरीराने लंकेत जाणे आणि तेथील प्रत्येक गोष्ट बारकाईने पाहणे अशक्य होते. म्हणून महावीर हनुमंताने जणू अणिमा सिद्धीचा प्रयोग करून स्वत: सूक्ष्मरूप धारण केले आणि भगवंताचे स्मरण करीत तो लंकेच्या दारावर पोहोचला. लंका नगरीची अधिष्ठात्री देवी लंकिनीने संध्याकाळी त्यास लपत-छपत नगरात घुसताना पाहिले. तिला मोठी शंका आली. ती हनुमंताजवळ आली आणि रागावून म्हणाली, 'तू चोरी करणार आहेस काय ?' हनुमंताने तिच्या पाठीवर एक हलकासा ठोसा लगावला. त्यामुळे ती रक्त ओकीत जमिनीवर धाडकन कोसळली.तिने स्वत:ला सावरून म्हटले- 'जा, मी तुला ओळखले. ब्रह्मदेवाने मला पूर्वीच सांगितले होते की जेव्हा वानराच्या माराने तुझी अशी दशा होईल, तेव्हा रावणाचा अंत जवळ आला आहे, असे समज.' हनुमंताने आत प्रवेश केला. त्याने लंकेत प्रवेश करून राक्षसांचा आहार-विहार आणि झोपण्याच्या जागा पाहिल्या. त्यांची अस्त्रे ठेवण्याची ठिकाणे, सल्लामसलतीचे ठिकाण, छावण्या इत्यादीही त्याने पाहिले. सीतेचा शोध घेण्यासाठी त्याने राक्षसराज रावणाचे अंत:पुर बारकाईने धुंडाळले. मंदोदरी इत्यादी राण्याही पाहिल्या. परंतु सीतेचा कुठे पत्ता लागला नाही. तो काळजीत पडला. त्याला फार वाईट वाटले. तो विचार करू लागला, 'मी धर्माचे उल्लंघन तर केले नाही ना ! परस्त्रियांना पाहणे अधर्म आहे. मी आतापर्यंत कधीही हे पाप केले नव्हते. आज माझ्याकडून फार मोठा अन्याय झाला

आहे.' त्याला चिंता वाटू लागली. दुसऱ्याच क्षणी त्याच्या मनात दुसरी गोष्ट आली. त्यावेळी भगवंताच्या स्मरणाने त्याचे चित्त निर्मळ झाले होते आणि त्याच्या मनाचा निश्चय झाला. त्याने विचार केला, 'मी परस्त्रियांना पाहिले खरे; परंतु त्यांना वाईट नजरेने पाहिले नाही. आवश्यक होते म्हणून पाहिले आणि माझ्या मनात थोडासुद्धा वाईट विचार आला नाही. इंद्रियांच्या शुभ अथवा अशुभ प्रवृत्तीस मनच कारण होत असते आणि माझे मन अतिशय व्यवस्थित आहे. मी सीतेला दुसरीकडे कोठे शोधणार ? हरिणींच्या मध्ये तर स्त्रीचा शोध घेता येणार नाही. स्त्रियांमध्येच स्त्रीचा शोध घेता येईल. मी शुद्ध मनाने शोध घेतला आहे, म्हणून मला काहीही दोष नाही.' हनुमंताने इतर ठिकाणीही शोध घेण्याचा प्रयत्न केला. पुढे गेल्यावर त्याला एक लहान झोपडी दिसली. त्या झोपडीच्या भिंतीवर जागोजागी रामनाम लिहिलेले होते. ती नावे रात्रीसुद्धा रत्नांच्या झगमगाटामुळे स्पष्ट दिसत होती. लहान लहान वाफ्यात तुळशीची रोपे, केशर आणि सुगंधित फुलांची झाडे होती. त्या पर्णकुटीच्या समोरच एक लहानसे भगवंताचे मंदिर होते आणि त्यावर भगवंतांच्या आयुधांची चित्रे काढलेली होती. हनुमंताला फार मोठे आश्चर्य वाटले की लंकेत असे स्थान कसे काय ? त्याला आनंदही झाला.

ब्राह्ममुहूर्ताची वेळ होती. बिभीषण जागे होऊन राम राम म्हणू लागले होते. हनुमंताला वाटले, 'हा तर कोणी संत असावा.' त्याने त्याचा परिचय करून घेण्याचा दृढ निश्चय केला. हनुमंताने ब्राह्मणाचे रूप धारण करून 'राम-राम' असा उच्चार केला. बिभीषण ताबडतोब बाहेर आला. दोघे भगवद्भक्त परस्परांना कडकडून भेटले. दोघांची मने प्रेमाने आणि आनंदाने भरून गेली. हनुमंताला बिभीषणाच्या हृदयात साक्षात भगवंत दिसत होता आणि बिभीषण हनुमंताला साक्षात भगवानच समजू लागला होता. ओळख झाली. हनुमंताजवळ स्वत:बद्दल सांगण्यासाठी होतेच काय ? त्याने आपल्या दयाळू प्रभूचे पावन चरित्र आणि सीताहरणाचा प्रसंग सांगून आपल्या येण्याचे कारण सांगितले. बिभीषणाने म्हटले, 'प्रिय हनुमाना ! ज्याप्रमाणे दातांच्या कचाट्यात बिचाऱ्या जिभेला राहावे लागते, तसे इथे मला सावधपणे व मोठ्या मुश्किलीने रहावे लागते. प्रभु मज अनाथाचा कधी स्वीकार करतील

काय ? माझी जात तमोगुणी आहे. माझ्याकडून काही साधन होत नाही. भगवंतांच्या चरणी माझे प्रेम नाही. तर मला भगवंतांची भेट होईल, ही कशी काय आशा करू ? परंतु आता तुम्हांला पाहून माझ्या मनाला खात्री वाटतेय. कारण भगवत्कृपेवाचून त्यांच्या कृपापात्र संतांचे दर्शन होत नाही. भगवत्कृपेनेच तुम्ही माझ्या दारी येऊन मला दर्शन दिले आहे. संतदर्शन म्हणजे भगवद्‌भेटीची सूचना होय, हे निश्चित.' हनुमंत म्हणाला, 'बिभीषणा ! आमचे भगवान फारच दयाळू आहेत. ते नेहमीच दीन लोकांवर कृपा करीत आले आहेत. तुम्ही तर स्वत:बद्दल बोलत आहात. माझ्याकडे पहा. मी कुठे कुलीन आहे ? वानर, चंचल आणि साधनहीन ! दुसऱ्यांचे कल्याण माझ्याकडून होणे तर दूरच राहो, जर कोणी सकाळी उठून माझे नाव घेतले, तर त्याला दिवसभर जेवण मिळत नाही. मित्रा बिभीषणा ! मी इतका अधम आहे. असे असूनही भगवंतांनी माझ्यावर कृपा केली आहे. जे अशा स्वामींना जाणूनही त्यांची भक्ती करीत नाहीत, संसारात भरकटत राहतात, ते दुःखी का बरे होणार नाहीत ?' भगवंतांच्या अलौकिक गुणांचे स्मरण करून हनुमंताचे हृदय भरून आले. त्याचे नेत्र प्रेमाश्रूंनी डबडबले. बिभीषण आणि हनुमंत यांच्यात खूप गप्पा झाल्या. बिभीषणाच्या सांगण्यावरून हनुमान अशोकवनात गेला.

सीतामाता अशोक वृक्षाखाली बसली होती. तिचे शरीर कृश झाले होते व केसांची जटा बांधली होती. मस्तकावर सौभाग्याचे चिन्ह म्हणून केवळ एक वेणीच होती. ती निरंतर भगवंतांच्या नामाचा जप आणि मनातल्या मनात भगवंतांच्या लीला तसेच त्यांच्या गुणांचे स्मरण करीत होती. हनुमंताने दुरूनच तिला मनातल्या मनात प्रणाम केला आणि तो एका वृक्षावर चढून बसला. रावण आला आणि त्याने सीतेला प्रलोभन दाखविण्याचा प्रयत्न केला, नंतर धमकावले; परंतु सीतेची दृढता, पवित्रता, रामनिष्ठा आणि सतीत्व यांमुळे प्रभावित होऊन तो परतला. पुष्कळशा राक्षसिणी सीतेला समजावू लागल्या की, तू रावणाला अनुकूल हो. या गोष्टीमुळे सीतेला फार दुःख झाले. रामाचा ठाव-ठिकाणा न लागल्यामुळे त्यांचे 'काही बरे-वाईट तर झाले नाही ना' अशीही शंका निर्माण झाली. असे वाटले की, आता ती जिवंत राहणार नाही. त्रिजटा राक्षसी आपल्या स्वप्नाचा वृत्तांत सांगून तिला आश्वासन देऊ लागली.

नंतर पुष्कळशा राक्षसिणी तेथून निघून गेल्या. थोड्या वेळानंतर त्रिजटादेखील निघून गेली.

सीता मातेला अत्यंत व्याकूळ झालेली पाहून हनुमंताने रामजन्मापासून विवाह, वनगमन, सीताहरण इत्यादीचा वृत्तांत वृक्षावरून सांगितला आणि शेवटी म्हटले, 'त्यांनीच पाठविल्याने मी येथे आलो आहे.' हनुमंताची ही अमृतवाणी ऐकून सीतेला फार संतोष झाला. परंतु दुसऱ्याच क्षणी एका संशयाने तिचे हृदय व्याकूळ झाले. तिला वाटले की, हीदेखील राक्षसी माया तर नाही ना ? हनुमंताने सीतामातेचा भाव ओळखला. तो म्हणाला, 'माते, मी करुणानिधानांच्या चरणांची शपथ घेऊन सांगतो की, मी भगवान रामांचा सेवक आहे. त्यांनी आपणांस विश्वास वाटावा, यासाठी मला एक खाजगी गोष्ट सांगितली आहे. जेव्हा आपण वनात त्यांच्याबरोबर होता आणि जयंताने कावळ्याचा वेष धारण करून आपल्यावर आक्रमण केले होते, तेव्हा भगवंतांनी त्याच्यावर इषीकास्त्राचा प्रयोग केला होता. त्यावेळी त्याला त्रैलोक्यात कुठेही आश्रय मिळाला नाही. आपली आंगठी, जी आपण केवटाला देण्यासाठी त्यांना दिली होती आणि भगवंतांनी जी आपल्या बोटात धारण केली होती, ती आंगठीदेखील भगवंतांनी आपल्याला खात्री पटावी म्हणून माझ्याकडे दिली आहे. आपणांस मी प्रणाम करतो. आपण माझ्यावर विश्वास ठेवा.'

हनुमंताचे अंत:करण निष्कपट होते आणि त्याने प्रत्यक्ष प्रमाण देखील सादर केले, म्हणून सीतेला विश्वास वाटला. तिने हनुमंताला खाली बोलावले. तसेच आंगठी घेऊन ती आनंदमग्न झाली. तिला भगवंताचा संदेश प्राप्त झाल्यामुळे एवढा आनंद झाला की, जणू काय स्वत: प्राणप्रिय भगवानच भेटले. तिने हनुमंताला म्हटले- 'हनुमाना ! आज तू माझ्यावर फार मोठा उपकार केला आहेस. भगवानच मला विसरून गेले आहेत अथवा त्यांचे काही अनिष्ट झाले आहे, असे समजून मी प्राणत्याग केला असता तर, ही गोष्ट ऐकून त्यांना किती त्रास झाला असता ? माझ्यामुळे ते दु:खी झाले असते. हनुमाना ! ते माझी कधी आठवण काढतात का ? मी त्यांना कधी पाहू शकेन का? ते माझा लवकर उद्धार करतील का ?' असे बोलत बोलत तिला गहिवरून आले. डोळ्यांत अश्रू भरून आले. त्यामुळे ती बोलू शकली

नाही. हनुमान म्हणाला, 'माते ! तुम्ही एवढ्या दु:खी का होता ? राम तुमच्यासाठी किती दु:खी आहेत, याचे वर्णन मी करू शकत नाही. ते पृथ्वीकडे पाहून म्हणतात की 'हे पृथ्वीमाते ! तुझ्या प्राणप्रिय कन्येला माझ्यामुळे फार मोठे कष्ट झाले आहेत. त्यामुळेच तू माझ्यावर नाराज आहेस का ? म्हणूनच मला सामावून घेण्यासाठी स्थान देत नाहीस का ?' ते फुललेल्या फुलांना आणि कळ्यांना पाहून म्हणतात, 'लक्ष्मणा ! त्या वेचून आण. मी सीतेच्या वेणीत गुंफीन. माते ! त्यांची विरहकथा अवर्णनीय आहे. ते स्वत:ला विसरून जातात आणि नेहमी आपलीच आठवण करतात.'

हनुमंत पुढे म्हणाले, 'माते ! त्यांनी आपणाला उद्देशून सांगितले आहे, 'प्रिये ! तुझ्या उपस्थितीत ज्या वस्तू माझ्यासाठी सुखकर होत्या, त्याच आज दु:खकर होत आहेत. सुंदर सुंदर वृक्षांची नवीन कोवळी पाने आज मला अग्नीसारखी वाटत आहेत. चंद्रमा ग्रीष्म ऋतूतील सूर्यासारखा जाळत आहे आणि अमृतासारखे वाटणारे ढगातील लहान लहान थेंब आज उकळत्या तेलासारखे वाटत आहेत. शीतल, मंद, सुगंधित वायू विषारी सापांच्या फुत्कारासारखे मला दु:ख देत आहेत. जर मी हे माझे दु:ख कोणाजवळ सांगून प्रगट करू शकलो असतो, तर माझे मन काहीसे हलके झाले असते. परंतु कोणाला सांगू ? काय सांगू ? माझे मन कोणाला समजेल तर ना ? आपल्या दोघांचे जे परस्परांवरील प्रेम आहे, एकमेकांच्या आत्म्याचा संयोग आहे, मीलन आहे, याचे रहस्य केवळ माझे हृदय, माझा आत्माच जाणतो आणि ते माझे हृदय आणि आत्मा सर्वदा तुझ्याजवळच असतो. एका क्षणासाठीही तो तुझ्यापासून वेगळा होत नाही.* केवळ इतके सांगितल्याने आपल्या अजोड प्रेमाची व्याख्या होईल का ? मी तर म्हणेन, कधीच होत नाही. परंतु यापेक्षा अधिक काय सांगता येईल ?'

हे सांगत असताना हनुमान भावमग्न झाले होते. सीतेला असे वाटले की, जणू काही रामच तिच्यासमोर उभे राहून बोलत आहेत. ती प्रेममग्न झाली होती. तिला देहभान राहिले नाही. हनुमंताने तिला धीर देत म्हटले-

* तत्त्व प्रेम कर मम अरु तोरा। जानत प्रिया एकु मनु मोरा॥

'माते ! भगवंताचा प्रभाव, ऐश्वर्य आणि सामर्थ्य यांकडे पाहा. त्यांच्या बाणांसमोर हे तुच्छ राक्षस एक क्षणभरसुद्धा टिकू शकणार नाहीत. हे मेलेच असे समजा. भगवंतांना आतापर्यंत आपला शोध लागला नव्हता. नाही तर यापूर्वीच राक्षसांचा संहार करून ते आपणाला केव्हा घेऊन गेले असते, ते कळलेच नसते. आम्ही सर्व वानरे, अस्वले त्यांच्याबरोबर येऊ आणि राक्षसांना आपटून आपटून मारू आणि आपणाला घेऊन आनंदाने अयोध्येला जाऊ.

माते ! आपण प्रभूंचा प्रताप विसरला की काय ? त्यांना कळताच ते तेथून सैनिकांसह कूच करतील. समुद्राला बाणांनी आटवतील, लंकेत एकही राक्षस वाचणार नाही. देवता, दानव आणि स्वतः मृत्यूही भगवान रामांच्या मार्गात जर विघ्न आणू इच्छितील, तर ते त्यांनाही नष्ट करून टाकतील. माते ! मी शपथपूर्वक सांगतो, आपल्या वियोगाने राम इतके दु:खी आहेत की, त्याचे वर्णन करता येणार नाही.ते एका क्षणाचाही विलंब करणार नाहीत. आपण त्यांना लवकरच सुखरूप पाहाल.' सीतेने म्हटले- 'हनुमाना ! आतापर्यंत दहा महिने निघून गेले, आता दोनच महिने बाकी आहेत. जर एवढ्यात भगवंतांनी माझा उद्धार केला नाही, तर मी त्यांच्या भेटीपासून वंचित राहीन. मी त्यांच्या भेटीच्या आशेनेच जिवंत आहे. जर बिभीषणाने समजूत घालून माझे रक्षण केले नसते, तर रावणाने आतापर्यंत मला मारून टाकले असते.' सीतादेवी हनुमंताशी असे बोलता बोलता व्याकूळ झाली, तिच्या घशाला कोरड पडली. ती बोलू शकली नाही.

हनुमंत म्हणाला, 'माते ! मी म्हटले ना की, भगवान माझा निरोप मिळताच कूच करतील. परंतु ते येण्याची काय गरज आहे ? मी आजच आपणांला या दु:खातून मुक्त करतो. आपण माझ्या पाठीवर बसा. मी आपल्याला पाठीवर बसवून समुद्र उल्लंघून जाईन. जसा अग्नी, हवन केल्या गेलेल्या हविर्द्रव्याला इन्द्राकडे पोहोचवितो, तसेच मी आपल्याला ताबडतोब प्रवर्षण पर्वतावर असलेल्या भगवान रामांजवळ पोहोचवितो. भगवत्कृपेने केवळ आपणांलाच नव्हे तर रावणासह साऱ्या लंकेला मी वाहून नेऊ शकतो.आता उशीर करू नका. जेव्हा मी आपणाला घेऊन जाऊ लागेन, तेव्हा कोणताही राक्षस माझा पाठलाग करू शकणार नाही.' हनुमंताचे वचन

ऐकून सीता फार प्रसन्न झाली. ती म्हणाली, 'हनुमाना ! तुझे शरीर तर फार लहान आहे आणि मला घेऊन जाण्याचे साहस तू कसे करणार ?' हनुमंताने आपले विराट रौद्ररूप सीतेला दाखविले. तो वाढत वाढत सुमेरू पर्वताएवढा झाला. त्याने सीतेला म्हटले, 'देवी ! आता उशीर करू नका. म्हणाल तर राक्षसांसह लंका घेऊन जाईन. म्हणाल तर राक्षसांचा संहार करून लंका घेऊन जाईन. ठरवा आणि माझ्याबरोबर येऊन राम-लक्ष्मण यांना सुखी करा.'

जानकी म्हणाली, 'हनुमाना ! मी तुझी शक्ती, तुझे सामर्थ्य ओळखले. तू वायू आणि अग्नीसारखा प्रतापवान आहेस. तू मला घेऊन जाऊ शकतोस. परंतु तुझ्याबरोबर माझे जाणे योग्य होणार नाही. मी तुझ्या तीव्र वेगाने मूर्च्छित होईन. तुझ्या पाठीवरून खाली पडू शकेन. तुला राक्षसांबरोबर भयंकर युद्ध करावे लागेल. आणि मी पाठीवर असल्यामुळे तुला फार मोठ्या संकटांना तोंड द्यावे लागेल. युद्धाचा प्रसंग आहे. तुझा विजय होईल की त्यांचा, काही सांगता येत नाही. कदाचित तू जिंकूही शकशील, परंतु त्यामुळे भगवंतांची कीर्ती वाढणार नाही. माझ्या अशा प्रकारे जाण्याने लोक म्हणतील की, हनुमान आपल्या पाठीवरून कोणास नेत आहे ? क्षणभर का होईना, त्यांना आपल्या चारित्र्याविषयी शंका येईल.' सीतेने याव्यतिरिक्तही पुष्कळशी कारणे सांगून म्हटले-'पतिभक्तीच्या दृष्टीने मी स्वेच्छापूर्वक तुझ्या शरीराला स्पर्श करू शकत नाही. रावणाने माझ्या शरीराला स्पर्श केला होता. त्यावेळी मी असमर्थ होते.काय करणार?'*

राम जेव्हा येऊन राक्षसांसह रावणाचा संहार करतील, तेव्हा मी त्यांच्याबरोबर येईन आणि हेच त्यांना योग्य ठरेल.' हनुमंताने सीतेच्या वचनांचा आदर केला आणि तिची प्रशंसा केली. सीता म्हणाली, 'वत्सा ! तुझी भक्ती, भगवंतांवरील विश्वास आणि तुझे बल-सामर्थ्य पाहून मला फार

---

* भर्तुर्भक्तिं पुरस्कृत्य रामादन्यस्य वानर ।
नाहं स्प्रष्टुं स्वतो गात्रमिच्छेयं वानरोत्तम ॥
यदहं गात्रसंस्पर्शं रावणस्य गता बलात् ।
अनीशा किं करिष्यामि विनाथा विवशा सती ॥
(वा.रा. ५/३७/६२-६३)

आनंद झाला. मी तुला आशीर्वाद देते की, तू मोठा बलवान, शीलवान, अजर-अमर आणि गुणी हो. भगवान तुझ्यावर सदा प्रेम करोत.'

'भगवान सदा प्रेम करोत' हे ऐकून हनुमान रोमांचित झाला. त्याला यापेक्षा दुसरे काय हवे होते? जीवनाचा परम लाभ तर हाच आहे. त्याने मातेचा आशीर्वाद अमोघ समजून कृतकृत्यता प्रगट केली.

मातेचे दर्शन झाल्यानंतर हनुमंताने विचार केला, 'आता तर श्रीरामाचे रावणाबरोबर युद्ध अटळ आहे.परंतु येथील किल्ला एवढा मजबूत आहे, याच्या चारी बाजू एवढ्या सुरक्षित आहेत, याच्या दरवाजांवर अशा प्रकारची यंत्रयोजना केली आहे की, हा सहज जिंकणे शक्य नाही. हा फोडल्याशिवाय आमच्या आक्रमणाचा मार्ग मोकळा होणार नाही. परंतु हा फोडायचा कसा, हा एक प्रश्न आहे. बरे ! मी तर वानर आहे ना ! मी फळे तोडून खाऊ शकतो. कारण आता भगवंतांचे काम झाले आहे. मी काही वृक्षांच्या फांद्या मोडू शकतो. कारण या दुष्टांना उत्तेजित करण्याचा हाच एक मार्ग आहे.' हनुमंताने निश्चय केला. त्याची बुद्धी आणि सामर्थ्य पाहून मातेनेही अनुमती दिली.

बागेतील अनेक वृक्ष नष्ट झाले. बागवानांना पिटाळले. हजारो राक्षसांना धुळीला मिळविले. एका ठोशानेच अक्षयकुमाराची हाडे खिळखिळी झाली. साऱ्या लंकेत हाहाकार माजला. रावण तर स्वत:च प्रथम युद्ध करण्यासाठी निघाला होता. परंतु मेघनादाने त्याला थांबविले. तो स्वत: आला, हनुमंताच्या प्रहाराने त्याचे प्राण कासावीस झाले. त्याने घाबरून ब्रह्मपाशाचा उपयोग केला. जरी ब्रह्मदेवाच्या वरदानाने हनुमान ब्रह्मपाशापासून मुक्त होता, तरीपण त्याने विचार केला की, ब्रह्मपाशाचा अपमान करू नये आणि रावणाच्या सभेमध्ये जाऊन भगवंताचे माहात्म्य ऐकविले पाहिजे. त्यामुळे राक्षस भयभीत होतील. म्हणून त्याने स्वत:ला ब्रह्मपाशात बांधून घेतले.

मेघनाद मोठ्या आनंदाने त्याला राजसभेत घेऊन गेला. तेथे जाताना ते बंधन त्याच्या शरीरावरून सुटून खाली पडले. हनुमंताने पाहिले की, रावणाच्या सभेत मोठमोठ्या देवता, लोकपाल, दिक्पाल हात जोडून उभे आहेत. सूर्याचा प्रकाश मंद आहे, वायू पंख्याने वारा घालत आहे आणि अग्निदेव आज्ञेची

प्रतीक्षा करीत आहे. सर्वजण रावणाच्या इशाऱ्याची वाट पाहात आहेत. हनुमान नि:शंक उभा होता. त्याला असा ताठ्याने उभा राहिलेला पाहून रावणाने काय विचार केला कुणास ठाऊक. तो मोठ्याने हसू लागला. परंतु लगेच दुसऱ्या क्षणी त्याला आपल्या पुत्राची, अक्षयकुमाराची आठवण झाली. त्याने दरडावून विचारले, 'तू कोण आहेस ? कोणाच्या बळावर तू असा उत्पात माजवला आहेस ? तू मला ओळखत नाहीस काय ?' 'आता तुला मी कोण आहे ते दाखवितो,' हनुमंताने मोठ्या गंभीर स्वरात म्हटले, 'रावणा, जे संपूर्ण प्रकृतीचा आश्रय आहेत, ज्यांच्या रोम-रोमात कोटी कोटी ब्रह्मांडे प्रतिक्षणी उत्पन्न होतात आणि नष्ट होत राहतात, ज्यांच्या शक्तीने ब्रह्मा-विष्णु-महेश आपापले काम करतात, ज्यांच्या कृपेच्या अंशाने शेषनाग पृथ्वीला धारण करण्यास समर्थ होतो, जे तुझ्यासारख्या राक्षसांना शिक्षा करण्यासाठीच अवतीर्ण झाले आहेत, त्या भगवान श्रीरामांचा मी दूत आहे. तू त्यांना जाणत नाहीस काय ? जनकराजाच्या धनुर्यज्ञात जे धनुष्य तुला हालवणेही शक्य झाले नाही, ते ज्यांनी गवताच्या काडीसारखे तोडून टाकले, त्यांना तू विसरलास ! चौदा हजार सैन्यासह आलेल्या खर, दूषण आणि त्रिशिरा यांना एकट्याने मारणारे राम तुला ठाऊक नाहीत ? तुला काखेत दाबून ठेवणाऱ्या वालीला ज्यांनी एकाच बाणाने ठार मारले, त्यांना तू ओळखत नाहीस ? रावणा, तू त्यांना विसरशील, परंतु ते तुला विसरू शकणार नाहीत. ज्यांच्या अनुपस्थितीत वेष बदलून, धोका देऊन, ज्यांच्या धर्मपत्नीला तू चोरून आणले आहेस, त्यांना विसरलास, तरी तू वाचू शकणार नाहीस. मी त्यांचाच दूत आहे. मला चांगल्या प्रकारे ओळखून ठेव.आता उशीर नाही. त्यांच्या बाणांनी लंका उध्वस्त होईल आणि या तुझ्या सभासदांची नावनिशाणीसुद्धा शिल्लक राहणार नाही.'

हनुमंताची निर्भीड वाणी ऐकून राक्षस भीतीने थरथर कापू लागले. त्यांच्या मनात भय घर करून बसले. त्यामुळे ते युद्धातही वीरतापूर्वक प्रभू रामचंद्रांशी सामना करू शकले नाहीत. देवगण मनातल्या मनात प्रसन्न झाले.रावणाने हनुमंताच्या बोलण्याकडे लक्षच दिले नाही. हनुमान पुन्हा म्हणाला- 'भूक लागल्यावर फळे खाल्ली, हा काही मी अपराध केला नाही. झाड-पाला

तोडणे हा तर माझा स्वभावच आहे. ज्या दुष्टांनी मला मारले, [illegible]
आत्मरक्षण करण्यासाठी मीही त्यांच्यावर प्रहार केला आहे. [illegible]
तुझ्या पुत्रांचाच आहे. त्यांनी मला बंदिवान बनविण्याचा प्रयत्न [illegible]
मी त्यांना क्षमा करतो. तू माझी एक गोष्ट ऐक. मान्य कर. मी नम्र[illegible]
आहे, प्रेमाने सांगत आहे आणि तुझ्या हितासाठी अंतःकरण पूर्व[illegible]
आहे. मित्रा रावणा, जो काळ साऱ्या दुनियेला गिळून टाकतो, तो श्[illegible]
भितो, तो त्यांच्या अधीन राहतो. त्यांच्याशी वैर करून तू वाच[illegible]
नाहीस. तू जानकी माईला घेऊन चल. परम कृपाळू भगवान [illegible]
करतील. ते शरणागताचे सर्व अपराध विसरतात. तू त्यांच्या चरणा[illegible]
कर आणि लंकेचे निष्कंटक राज्य भोग. तू फार कुलीन आहेस. [illegible]
अलोट संपत्ती आहे. तू फारच विद्वान आहेस आणि तुझ्या ठिका[illegible]
सामर्थ्य आहे. हे प्राप्त झाल्यामुळे गर्व करू नकोस, कारण हे सर्व[illegible]
आहे. चल, भगवंताला शरण जा. मी अगदी शपथ घेऊन सत्य सा[illegible]
रामाकडे पाठ फिरविल्यास तुझे कोणीही रक्षण करू शकणार नाही[illegible]

जरी हनुमंताने बऱ्याच कल्याणकारी गोष्टी सांगितल्या, तरी ति[illegible]
त्या आवडल्या नाहीत.त्याने चिडून राक्षसांना आज्ञा दिली, 'याला
बिभीषणाने विरोध केला, 'दूताला ठार करणे अन्याय आहे.' शेव[illegible]
अवयव तोडण्याचे निश्चित झाले आणि रावणाने त्याची शेपूट [illegible]
आज्ञा केली. शेपटीला वस्त्र गुंडाळले जाऊ लागले. ती शेपटी तेलात [illegible]
गेली आणि पेटवून दिली गेली. दहा-वीस राक्षस मिळून त्या[illegible]
नगरात फिरवू लागले. मुले टाळ्या वाजवून वाजवून मोठ्याने ह[illegible]
हनुमंताला लंकाविध्वंस करण्याची हीच संधी उपयुक्त वाटली. त्या[illegible]
शेपटीस एक झटका दिला, त्यामुळे सर्व राक्षस आपले प्राण वा[illegible]
गेले. त्याने उडी मारली आणि एका महालावरून दुसऱ्या महाला[illegible]
तो सर्व भस्म करू लागला. वायूने त्याला सहकार्य केले. अग्नी[illegible]
मित्र वायूच्या पुत्राच्या कार्यास हातभार लावला. लंका ध[illegible]

*मोहमूल बहु सूल प्रद त्यागहु तम अभिमान ।
भजहु राम रघुनायक कृपा सिंधु भगवान ।।

लागली.पुष्कळशी यंत्रे नष्ट करून टाकली. धोक्याची ठिकाणे भस्म करून टाकली. परंतु सोन्याची लंका अजुनी जळाली नव्हती. साऱ्या नगरात जरी हाहाकार माजला होता, सर्व आपापले सामान, मुले-बाळे आणि बायका तसेच वृद्धांना घेऊन पळत सुटले होते, तरी लंका जळतानासुद्धा चमकू लागली होती.

असे म्हणतात की, लंकेच्या एका अंधारकोठडीत शनिदेव कैदेत होता. हनुमंताचा पाय त्या कोठडीला लागला आणि ती पडली. शनिदेवाने हनुमंताला विचारून सर्व वृत्तांत ऐकून घेतला आणि एका दृष्टिक्षेपात लंकेकडे पाहिले. एकट्या बिभीषणाचे घर सोडून सर्व लंका जळून भस्म झाली. त्याने हनुमंताला वरदान दिले आणि सांगितले की, आता लंकेचा सत्यानाश होण्याचा काळ जवळ आला आहे, असे सांगून तो निघून गेला. शनिदेवाला मुक्त करून हनुमंताने पाहिले की, सारी लंका उध्वस्त झाली आहे. हिच्या अवघड मोर्चेबंदीत आता कोणताही धोका राहिला नाही, तेव्हा त्याने समुद्रात उडी मारली आणि स्नान करून पुन्हा तो सीतामातेजवळ आला. सीतामातेने भगवंतांना ओळख पटण्यासाठी आपल्या वेणीतील चूडामणी दिला आणि लवकरात लवकर आपल्या उद्धाराची प्रार्थना करण्यास सांगितले. तिला प्रणाम करून घोर गर्जना करीत हनुमान तेथून निघाला.

जाम्बवान, अंगद इत्यादी वानर काहीही न खाता-पिता एका पायावर उभे राहून हनुमंताची प्रतीक्षा करीत होते. हनुमंताचा भुभुःकार ऐकूनच सर्वांनी कार्यसिद्धीचा अंदाज केला. आणि पुढे होऊन त्याला आलिंगन दिले. खात-पीत, मधुवन उजाड करीत सर्वजण भगवान रामाजवळ गेले. हनुमंताने फारच करुण शब्दांत सीतेची दशा वर्णन केली. लंकेचे ऐश्वर्य, रावणाची शक्ती आणि तेथील प्रत्येक गोष्ट त्यांनी भगवंतांना सांगितली. भगवान म्हणाले, 'हनुमंता ! तुझ्यासारखा माझा उपकारक जगात दुसरा कोणीही नाही. मी तुला काय देऊ ? तुझा मी इतका ऋणी आहे की, तुझ्या नजरेला नजर भिडवू शकत नाही.' भगवंताचे हे वचन ऐकून हनुमान व्याकूळ झाला. त्याने भगवंतांच्या चरणांवर लोळण घेतली आणि तो प्रेममग्न झाला. भगवान रामांनी बळेच त्याला उचलून आलिंगन दिले आणि आपल्या अनन्य भक्तीचे वरदान दिले.

भगवान शंकरांची अभिलाषा पूर्ण झाली. ज्याच्यासाठी ते हनुमान झाले होते, ते कार्य पूर्ण झाले.



(३)

हनुमंताच्या जीवनात असे वैशिष्ट्य आहे की, जो त्याच्याजवळ आला, त्याला त्याने कोणत्या ना कोणत्या प्रकारे भगवंतांच्या सान्निध्यात पोहोचविलेच. त्याला लंकेमध्ये बिभीषण भेटला. याच्या संसर्गाने आणि भाषणाने तो एवढा प्रभावित झाला की, रावणाच्या भरसभेत त्याने हनुमंताची बाजू घेतली आणि शेवटी रावणाचा त्याग करून तो रामाला शरण आला. त्यावेळी सुग्रीवाने विरोध केला तरी भगवंतांनी शरणागताच्या रक्षणासंबंधीच्या प्रतिज्ञेची घोषणा केली. तेव्हा हनुमंताला एवढा आनंद झाला की, सांगता येत नाही. अंगदाला बरोबर घेऊन सर्वांत प्रथम हनुमान आनंदाने उडी मारून बिभीषणाजवळ गेला आणि त्याला भगवंताजवळ घेऊन आला. त्याचे केवळ एकच काम - भगवंताची सेवा, भगवंताला शरण जाणाऱ्यांना सहाय्यता.

समुद्र-बंधन झाले, त्यात हनुमंताने किती पर्वत आणले, त्याची काही मोजदाद नाही. सेतू पूर्ण होता होता हनुमान उत्तर सीमेकडून एक पर्वत आणीत होता. इंद्रप्रस्थापासून काही दूर अंतरावर गेल्यानंतर त्याला असे कळले की, सेतुबंधनाचे कार्य पूर्ण झाले आहे. त्याने विचार केला की, आता हा पर्वत नेऊन काय करायचे आहे, म्हणून तो तेथेच ठेवला. परंतु तो पर्वत सामान्य पर्वत नव्हता. त्याच्या आत्म्याने प्रकट होऊन हनुमंताला म्हटले, 'भक्तराज, माझ्याकडून असा कोणता अपराध घडला आहे की, आपल्या करकमलांचा स्पर्श प्राप्त होऊनही मी भगवंतांच्या सेवेपासून वंचित होत आहे. मला येथे सोडू नका, तेथे नेऊन भगवंतांच्या चरणी समर्पित करा. पृथ्वीवर स्थान नसेल, तर समुद्रात बुडवून टाका. भगवंतांच्या कामी आलो तर जिवंत राहणे चांगले, नाही तर या जीवनाचा काय लाभ ?' हनुमान म्हणाले, 'गिरिराज! तू खरा गिरिराज आहेस. तुझी ही अविचल निष्ठा पाहून माझ्या मनाला वाटते की, तुला घेऊन जावे. परंतु भगवंतांनी घोषणा केली आहे की, आता कोणीही

पर्वत आणू नये. माझा नाइलाज आहे. परंतु मी तुझ्यासाठी भगवंतांना प्रार्थना करतो आणि ते जशी आज्ञा देतील, तसे मी तुला सांगतो.' हनुमान भगवंताजवळ गेले. त्याने पर्वताचा खरेपणा आणि प्रार्थना भगवंतांना निवेदन केली. भगवान म्हणाले - 'तो पर्वत तर माझा अतिशय प्रेमपात्र आहे. त्याचा तू उद्धार केला आहेस. त्याला जाऊन सांग की, द्वापार युगात मी कृष्णरूपाने अवतार घेऊन त्याला आपल्या कार्यासाठी घेईन आणि सात दिवस त्याला माझ्या करांगुलीवर धारण करून ब्रजवासी लोकांचे रक्षण करीन.' हनुमंताने ब्रजभूमीत जाऊन गोवर्धन पर्वतास भगवंताचा संदेश सांगितला. हनुमंताच्या कृपेने गोवर्धन पर्वत भगवंताचा परम कृपापात्र झाला. भगवंताच्या नित्यलीलेचे साधन बनला.



सुबेल पर्वतावर भगवान पर्णशय्येवर पहुडले होते. सुग्रीवाच्या मांडीवर त्यांचे मस्तक होते. अंगद-हनुमान पाय दाबीत होते. धनुष्य आणि भाता बाजूला जवळ ठेवलेले होते. लक्ष्मण पाठीमागे वीरासनावर बसून भगवंतांकडे पहात होता. भगवान आपल्या हातात बाण घेऊन कुरवाळीत होते. भगवंताने चंद्राकडे पाहून विचारले - 'मित्रहो, तुम्ही आपापल्या बुद्धीनुसार सांगा की, या चंद्रावर डाग कसला आहे ?' सुग्रीव, बिभीषण, अंगद इत्यादींनी आपापल्या कल्पनेप्रमाणे त्याची कारणे सांगितली. सर्वांच्या नंतर हनुमान म्हणाला - 'प्रभो ! चंद्रमा आपला सेवक आहे. आपलेही त्याच्यावर अत्यंत प्रेम आहे. तो आपणाला आपल्या हृदयात धारण करतो आणि आपण त्याच्या हृदयात राहता. बस ! आपणच चंद्राच्या हृदयात श्यामसुंदर रूपाने दिसत आहात.' भगवान हसू लागले. सर्वांना फार आनंद झाला.*

हनुमंताला तर सर्वत्र भगवंतांचे दर्शन होत होते. मग चंद्रामध्ये त्याने भगवंतांचे दर्शन घेतले, तर यात आश्चर्य ते काय ?

राम आणि रावणाचे भयंकर युद्ध झाले. हनुमंताने त्या युद्धात किती

*कह हनुमंत सुनहु प्रभु ससि तुम्हार प्रिय दास।
तव मूरति बिधु उर बसति सोइ स्यामता अभास॥

राक्षसांचा वध केला, हे तर रामायण-प्रेमी लोकांपासून लपलेले नाही. वेळोवेळी त्याने युद्धात राम, लक्ष्मण, बिभीषण, जाम्बवान सर्वांना मदत केली. मेघनादाशी युद्ध करताना लक्ष्मणाला फार मोठी भयंकर शक्ती लागली. तो रणभूमीवर मूर्च्छित झाला. मेघनाद आणि त्याच्यासारख्या अनेक सैनिकांनी मिळून लक्ष्मणाला उचलून नेण्याचा प्रयत्न केला, परंतु तो यशस्वी झाला नाही. ते लक्ष्मणाला जमिनीवरून उचलू शकले नाहीत. हनुमंताने त्याला सहज उचलले आणि रामाजवळ आणले. त्याला मूर्च्छित अवस्थेत पाहून राम शोकाकुल झाला. जाम्बवानाने सांगितले, 'लंकेत एक सुषेण नावाचे वैद्य राहतात.जर ते यावेळी आले, तर लक्ष्मण बरा होईल.'

हनुमंत लंकेला गेला. त्याने विचार केला की, हा शत्रुपक्षाचा वैद्य आहे. कदाचित रात्री येणार नाही, म्हणून त्याचे घरच उखडून घेऊन जावे. आणि त्याने तसेच केले. सुषेणाने रामसेनेत येऊन लक्ष्मणाला पाहिले आणि सांगितले, 'द्रोणाचल पर्वतातून जर आज रात्रीपर्यंत औषधी आल्या, तर लक्ष्मण जिवंत होऊ शकेल.' हनुमंताने भगवंताचे स्मरण करून द्रोणाचल पर्वताकडे प्रयाण केले. ही बातमी रावणाला मिळाली. त्याने कालनेमी राक्षसाची भेट घेऊन षड्यंत्र रचले की, हनुमंताला वाटेत जास्त उशीर व्हावा आणि तो उद्या सूर्योदयापर्यंत येथे परत येऊ नये. कालनेमीने ऋषीचा वेष धारण करून हनुमंताला फसविण्याचा प्रयत्न केला. परंतु मायापतीच्या दूतावर कोणाची माया चालू शकेल ? दैवयोगाने हनुमंताला समजले आणि त्याने त्या कपटी ऋषिमहाराजांना मृत्यूची गुरु-दक्षिणा देऊन पुढील प्रवास सुरू केला.

हनुमान द्रोणाचल पर्वतावर पोहोचला. रात्रीची वेळ होती. तो औषधी ओळखू शकला नाही. कदाचित औषधींनी स्वत:स लपविले असावे. हनुमंताला विलंब करणे तर माहीतच नव्हते. रातोरात त्याला लंका गाठावयाची होती. त्याने संपूर्ण पर्वतच उखडला आणि तो घेऊन निघाला. परतताना मार्गात अयोध्या लागली. भरताने दुरूनच पाहून अनुमान केले की , हा कोणीतरी राक्षस असावा. त्याने एक हलकासा बाण सोडला. बाण लागताच 'रामराम' म्हणत हनुमान मूर्च्छित होऊन खाली पडला. त्याच्या मुखातून 'रामराम ' ऐकून भरत त्याच्याजवळ धावत गेला. आणि मोठ्या प्रयत्नाने

हनुमानाला शुद्धीवर आणण्याचा प्रयत्न करू लागला. शेवटी म्हणाला, 'ज माझ्या अंत:करणात रामाची अनन्य भक्ती असेल तर, हा वानर आता जिवंत होवो.' हनुमंत उठून बसला. हनुमंताने सर्व वृत्तांत सांगितला. भरताने पश्चात्ताप करून स्वत:स भले-बुरे म्हटले आणि हनुमंताला बाणावर बसून जाण्यास सांगितले. हनुमानाने खूप नम्रपणे त्याचा प्रस्ताव नाकारला आणि तो द्रोणाचल पर्वत घेऊन लंकेला पोहोचला. त्यावेळी श्री राम फार व्याकूळ झाले होते हनुमान येताच त्यांनी त्याला छातीशी धरले.सुषेणाने उपचार केला आणि लक्ष्मणास् बरे वाटले. चहूकडे हनुमंताची कीर्ती गायली जाऊ लागली. हनुमंत सुषेणास घरासहित योग्य जागी ठेवून परतला.

रात्रीची वेळ होती. हनुमान पहारा देत होता. अहिरावण बिभीषणाच वेश धारण करून आला. हनुमंताने त्याला बोलावले आणि विचारले, 'i मित्रा, एवढया रात्री कुठून आलास ?' त्याने म्हटले, 'भगवंताच्या आज्ञे संध्या करण्यास गेलो होतो. येताना उशीर झाला. त्यांनी मला लवकर बोलावले आहे.' सर्वजण झोपले असताना अहिरावण, राम आणि लक्ष्मणाला आपल्य खांद्यावर घेऊन पळाला. भगवंताचे कोण हरण करू शकणार ? लक्ष्मण त कधी झोपतच नव्हता. परंतु जेव्हा प्रभूंना आपल्या भक्तांचा महिमा प्रगट करावयाचा असतो, तेव्हा ते साधारण मनुष्याप्रमाणेच लीला करतात. आज हनुमंताचा महिमा प्रगट करावयाचा होता,म्हणून ते गुपचुप अहिरावणाच्य खांद्यावर बसून निघून गेले.

दुसरे दिवशी सकाळी संपूर्ण सेनेत हाहाकार माजला. सुग्रीव, जाम्बवान बिभीषण सर्वच्या सर्व व्याकूळ होते. हनुमंताने ती घटना सांगितली. बिभीषण म्हणाला, 'ही अहिरावणाची माया आहे.माझा वेश दुसरा कोणीही धारण कर शकत नाही.' हनुमान म्हणाला,'तो कितीही बलवान असो, कोणत्याही गुप्त ठिकाणी राहात असो, मी त्याच्याजवळ जाईन आणि त्याचा वध करून माझ्या प्रभूला घेऊन येईन.' हनुमंत निघाला. दैवयोगाने अशी घटना घडली की, ज्यामुळे अहिरावण प्रभूला नागलोकात घेऊन गेला आहे, असे निश्चित समजले. तेथे जाऊन हनुमंताने महालात प्रवेश करण्याचा प्रयत्न केला. परंतु मकरध्वजाने त्याला अडविले. त्याने विचारले,'ए, तू कोण आहेस ?' 'तुम्हांल

माहीत नाही ? मी महावीर हनुमंताचा पुत्र आहे. चोरून जाऊ इच्छित असशील, तर मी तुला चांगली अद्दल घडवीन.' हे ऐकून हनुमान आश्चर्यचकित झाला. तो म्हणाला,'अरे बाबा ! मला तर कोणी पुत्र नाही. तू कोठून टपकलास?' मकरध्वज म्हणाला, 'जेव्हा आपण लंका जाळून सुमुद्रात स्नान करत होता, तेव्हा एक मासळी आपला घाम प्याली. तिच्या गर्भातून माझी उत्पत्ती झाली आहे.' हनुमंताने त्याला राम-लक्ष्मणाचा पत्ता विचारला.त्याने सांगितले, 'मला हे तर काही माहीत नाही.मात्र आज माझे स्वामी कोणाचा तरी बळी देत आहेत. तिथे कोणालाही जाण्याची आज्ञा नाही. मी आपणालाही जाऊ देणार नाही.'

त्या बाप-लेकांचे युद्ध सुरू झाले.एकापेक्षा एक श्रेष्ठ ! श्रेष्ठ बापाचा मुलगाही श्रेष्ठच ! शेवटी हनुमंताने त्याला त्याच्याच शेपटीने बांधले आणि तो मंदिरात घुसला. त्याच्या चरणांचा स्पर्श होताच देवी जमिनीत दबली गेली आणि हनुमंत मुख पसरून देवीच्या जागेवर उभा राहिला. राक्षसांना वाटले की, देवी प्रसन्न होऊन प्रगट झाली आहे. पुष्कळ पूजा केली गेली. आज देवी जे काही फूल, माळ ,अन्न, वस्त्र येत होते,ते मुखातच घालू लागली. बलिदानाचे वेळी राम आणि लक्ष्मण आणले गेले. त्यावेळी राक्षस त्यांची अनेक प्रकारे थट्टा करू लागले. त्यांना अनेक प्रकारे त्रास देऊ लागले. ते गुपचुप सहन करीत होते. काहीही म्हणत नव्हते. अहिरावण म्हणाला, 'आता तुम्ही आपले रक्षण करणाऱ्याचे स्मरण करा.' भगवान हसून म्हणाले, 'बघ, तुझी देवी तुलाच खाऊन न टाको.' तो त्यांच्यावर तलवार चालविणार एवढयात हनुमान गर्जना करून भगवंताजवळ पोहोचला आणि त्याने त्यांना आपल्या दोन्ही खांद्यांवर बसवून अहिरावणाच्या हातून तलवार हिसकावून घेतली. अहिरावण आणि राक्षस यांचा संहार करून हनुमान भगवंतांना शिबिरात घेऊन आला. चोहोकडे आनंदी आनंद झाला. हनुमंताच्या जयजयकाराने दिशा दुमदुमून गेल्या.

हनुमान निरंतर रामाच्या कामात मग्न असे. परंतु युद्धकाळात तो दिवसभर कधी भगवंताजवळ आणि कधी त्यांच्यापासून दूर राहून युद्ध करत असे आणि रात्री भगवंताचे चरण दाबत असे. त्यांच्याकडून धर्म, प्रेम, ज्ञान यासंबंधीच्या

गोष्टी ऐकत असे. कधी कधी, भगवंत त्याच्या अंगावरून करकमल फिरवीत. त्यामुळे त्याचा सर्व थकवा नाहीसा होत असे. जेव्हा भगवान राम झोपत असत, तेव्हा तो आपल्या लांब शेपटीचे उंच आसन करून त्यावर दरवाजाजवळ बसत असे आणि रात्रभर पहारा देत असे.तसेच प्रात:काल होतो न होतो तोच युद्ध चालू. काही कठीण प्रश्न निर्माण झाला की, जाम्बवान, सुग्रीव, अंगद सर्वजण हनुमंताला शरण येत असत.

रावणाशी युद्ध करताना एकदा हनुमंताने त्याला एक असा ठोसा मारला की, तो मूर्च्छित झाला होता. त्याने शुद्धीवर आल्यावर हनुमंताची फार प्रशंसा केली होती आणि जन्मात अशा वीराशी माझी कधी गाठ पडली नव्हती, हे मान्य केले होते. रावणाच्या प्रहाराने लक्ष्मण मूर्च्छित झाला होता. त्याचा पुत्र मेघनाद याच्याप्रमाणे आपणही त्याला उचलून न्यावे, असे रावणालाही वाटत होते.त्याने संपूर्ण शक्ती पणास लावली, पण लक्ष्मण उचलला गेला नाही. ते पाहून हनुमान धावला. रावणाच्या बाणांनी सर्व शरीर रक्तबंबाळ झाले होते, तरीही तो लक्ष्मणाजवळ जाऊन पोहोचला आणि रावणाला एक ठोसा मारला त्याने. लक्ष्मणाला फुलासारखे उचलून त्याने रामाजवळ आणले. रामांनी हनुमंताला आलिंगन देत लक्ष्मणाला म्हटले, 'हे बंधू ! तू तर काळाचाही महाकाळ आहेस. देवतांच्या रक्षणासाठी अवतीर्ण झाला आहेस. मग मूर्च्छा कशी ?' रामाचे वचन ऐकताच लक्ष्मण उठून बसला आणि मग दुप्पट उत्साहाने रणभूमीत गेला. हनुमंताच्या फार मोठ्या धाडसामुळे केवढे मोठे संकट क्षणात टळले.

राम विजयी झाले. आता सीतेजवळ विजयाचा संदेश घेऊन कोणी जावे ? भगवंतांनी हनुमंताला बोलावून म्हटले 'हनुमाना ! सीतेचा तुझ्यावर फार स्नेह आहे. आता ही विजयाची बातमी सांगण्यासाठी तूच तिच्याजवळ जा. बिभीषण महाराजांची आज्ञा घेऊन लंकेत प्रवेश कर आणि माझी, लक्ष्मणाची आणि सुग्रीवाची खुशाली सांग. तसेच रावणाच्या वधाचीही वार्ता कळव. सीता ज्या रीतीने प्रसन्न होईल, तसेच तिला सांग.' हनुमंताने लंकेत प्रवेश केला. लंकावासी राक्षसांनी त्याचा फार मोठा सन्मान केला. बिभीषणाची आज्ञा तर घेतलेलीच होती. तो अशोकवनात अशोकवृक्षाच्या

खाली बसलेल्या सीतेजवळ पोहोचला. तिच्या चरणी साष्टांग दंडवत करून त्याने सर्व वृत्तांत निवेदन केला. सीता एक क्षणभर काहीही बोलू शकली नाही. आनंदाच्या अतिरेकाने तिचा गळा दाटून आला. डोळे आसवांनी भरून आले. सीता म्हणाली, 'वत्सा, ही आनंदाची बातमी ऐकून मी थोडा वेळ काही बोलू शकले नाही, याबद्दल गैरसमज करून घेऊ नकोस. यापेक्षा अधिक सुखदायक वार्ता माझ्या दृष्टीने दुसरी असूच शकत नाही. मी विचार करीत आहे की, यासाठी तुला काय देऊ ? कारण आनंदाचा संदेश आणणाऱ्यास काहीना काही देण्याची प्रथा आहे. परंतु मी तुला त्रैलोक्याची संपूर्ण संपत्ती, संपूर्ण ऐश्वर्य दिले, तरीही माझे समाधान होणर नाही. तुझ्या हृदयात भगवंताची अनन्य भक्ती सदा राहो आणि मी तर तुझी सदैव ऋणीच राहू इच्छिते. सर्व सद्‌गुण तुझ्या मनात निवास करोत आणि रघुनाथांची तुझ्यावर सदा कृपा राहो.'

हनुमंताने हात जोडून म्हटले 'माते, माझ्याशी असे प्रेमपूर्ण बोलणारे तुमच्याशिवाय दुसरे कोण आहे ? माझ्या हृदयात सीतारामाची सदैव स्मृती राहावी, मी त्यांच्याच करकमलांच्या छत्रछायेत राहावे, यापेक्षा आपणाकडून देण्याजोगे अधिक श्रेष्ठ आहेच काय ? मी आपली कोणती सेवा करू, याची मला आज्ञा करा.' सीता म्हणाली, ' मी भगवंतांच्या दर्शनासाठी फारच उत्सुक आहे. आता एका क्षणाचाही विलंब सहन होत नाही.' हनुमान तेथून त्वरित निघाला आणि भगवंतांजवळ आला. त्याने त्यांना सीतेची प्रसन्नता, तिची दर्शनाविषयी उत्कंठा आणि प्रार्थना भगवंतांना निवेदन केली. भगवंतांनी बिभीषणाला आज्ञा दिली की, सीतेला घेऊन या.



भगवान राम, सीता, लक्ष्मण, सुग्रीव, बिभीषण इत्यादींबरोबर पुष्पक विमानात बसून अयोध्येकडे निघाले. प्रयागाला पोहोचल्यावर हनुमंताला बोलावून रामाने म्हटले, 'हनुमाना, अयोध्येला जाऊन बघ की, भरत काय करत आहे ? माझ्या वियोगात त्याला एक एक क्षणही कल्पासारखा वाटत असेल. माझा समाचार त्याला कळव आणि त्याचा समाचार घेऊन माझ्याकडे लवकर ये.' हनुमान निघाला.

अयोध्येत भगवंतांसाठी भरत किती व्याकुळ होत होता, याचे अनुमान कोणीही करू शकणार नाही. हनुमंताने त्याची स्थिती पाहिली. तो जटेचा मुकुट बांधून दर्भाच्या आसनावर बसला होता. त्याचे शरीर अत्यंत कृश झाले होते, नेत्रांतून अश्रू वहात होते आणि मुखाने सतत रामनामाचे उच्चारण होत होते. तो एवढा तन्मय होता की, त्याला येथे कोणी आले आहे, याचा पत्ताच लागला नाही. हनुमंताने स्वत:च त्याचे ध्यान भंग करून म्हटले - 'ज्यांच्या विरहात आपण दु:खी होत आहात, ज्यांच्या नामाचे व गुणांचे उच्चारण करीत आहात, तेच देवतांचे आणि मुनींचे रक्षक भगवान राम, जानकीमाता तसेच लक्ष्मण यांसह सुखरूप येत आहेत.' हनुमंताचे वचन ऐकताच भरताच्या शरीरात जणू नवीन प्राणांचा संचार झाला. त्याचे रोमरोम, सर्व नाड्या अमृताने भरून गेल्या. त्याने तात्काळ उठून हनुमंताला आलिंगन दिले. वृत्तांत कळल्यावर तर त्याच्या आनंदाला पारावर राहिला नाही. त्याने पुन्हा पुन्हा भगवान रामांचा वृत्तांत विचारला आणि हनुमंतानेही तोच वृत्तांत कित्येक वेळा सांगितला. दोघेही असीम आनंद अनुभवत होते.

भरत म्हणाला, 'मित्रा ! मी तुला काय देऊ ? याच्या बदली देण्यासारखी दुसरी कोणती गोष्ट आहे ? तुझा ऋणी राहण्यातच मला आनंद आहे' हनुमानाने त्याच्या पायांवर लोळण घेतली आणि त्याच्या प्रेमाची खूप खूप प्रशंसा करून सांगितले, 'भगवान राम नेहमीच आपल्याविषयी सांगत असतात. आपल्या सद्गुणांचे वर्णन करतात. आपल्या नावाचा जप करतात.' भरताची अनुमती घेऊन हनुमान तेथून निघाला.

भगवंताचा राज्याभिषेक झाला. सर्वांना बक्षिसे दिली गेली. भगवान रामाने स्वत: आपल्या हाताने सुग्रीव, बिभीषण इत्यादींना पुष्कळसे बहुमूल्य मणी, रत्ने, वस्त्रे, अलंकार इत्यादी दिले. परंतु त्यांनी काय विचार केला कुणास ठाऊक ? हनुमंताला काहीही दिले नाही. सर्वच सभासद विचार करू लागले की 'भगवान हनुमंताला का विसरले ?' भगवान सर्व जाणूनही गप्प होते. सीतामाता भगवंतांच्या लीलेचे रहस्य जाणून होती. परंतु इतरांना हनुमंताचे महत्त्व कळावे, यासाठी तिने निराळीच लीला केली. आपल्या कंठातून बहुमोल मण्यांची माळ काढून तिने हनुमंताच्या गळ्यात घातली. सर्वजण सीतामातेची

प्रशंसा करू लागले. हनुमंतानेही मोठ्या प्रेमाने तिचा स्वीकार केला. परंतु हे काय ? दुसऱ्याच क्षणी सर्व लोक आश्चर्यचकित होऊन हनुमंताकडे पाहू लागले. गंमत अशी की, हनुमान त्या माळेतील एक एक मणी काढायचा, तो दाताने फोडायचा आणि काळजीपूर्वक पाहून टाकून द्यायचा. हे असे एकसारखे चालू होते. किती मणी फोडले आणि टाकून दिले कोणास ठाऊक !

भगवान राम स्मित हास्य करीत होते. सीतामाता काहीशी गंभीर झाली. भरत, लक्ष्मण, शत्रुघ्न आश्चर्यचकित होऊन पाहात होते. परंतु सभासदांना राहवले नाही. ते म्हणाले, 'हनुमंता ! तू हे काय करीत आहेस ? हे बहुमोल मणी असे नष्ट करू नकोस.' एकाने हळूच म्हटले - 'शेवटी वानर ते वानरच ! या रत्नांची त्याला काय किंमत कळणार ?' सर्वजण नाराज होत असलेले पाहून हनुमान म्हणाला, 'बंधूंनो ! तुम्ही नाराज का होता ? मी तर या मण्यांचे महत्त्व किती आहे, याची परीक्षा घेत आहे. हे चमकदार आहेत, हे फार किंमतीने विकले जातात. एखादा किंमत देऊन हे विकतही घेऊ शकणार नाही, हेही शक्य आहे. हे परिधान केल्याने सौंदर्यही वाढते. हे सर्व खरे आहे. पण या सर्व गोष्टी महत्वाच्या द्योतक आहेत काय ? नाही, नाही. मी महत्त्वाची कसोटी जी मानतो ती ही की ज्या वस्तूत भगवंतांचे दर्शन होते, तीच वस्तू महत्त्वपूर्ण होय. या मण्यात भगवान दिसतात की नाही, हे मी पाहात होतो.मला दिसले नाहीत. मला यांची चमक अंधकारमय वाटली. हे घेऊन मला काय करायचे ? हे माझ्या काय कामाचे ? हे एक ना एक दिवस नष्ट व्हायचे आहेत, सुटायचेच आहेत, म्हणून मी हे नष्ट केले आणि टाकून दिले.'

हनुमंताचे वचन ऐकून बऱ्याच जणांना मणी फोडण्याचे रहस्य समजले, परंतु काही जणांच्या मनात संशय राहिला. त्यांनी विचारले, 'मग काय, तुझ्या हृदयात राम आहे ? जर असेल तर दाखव आणि नसेल तर तू हृदयाचे ओझे व्यर्थच का वाहिलेस ?' हनुमान म्हणाले, 'नक्कीच. माझ्या हृदयात तसेच राम आहेत, जसे तुम्ही समोर पाहात आहात.' त्याने दोन्ही हात छातीला लावून हृदय फाडून दाखविले. त्यात भगवान राम हे माता जानकी आणि भावांसह त्याच्या हृदयसिंहासनावर विराजमान आहेत. सर्वजण हनुमंताचे माहात्म्य गाऊ लागले. भगवंतांनी सिंहासनावरून उठून हनुमंतास आलिंगन दिले आणि

त्यांच्या शरीराचा स्पर्श होताच हनुमंताची छाती पूर्वीपेक्षाही अधिक मजबूत झाली. भगवंतांनी हनुमंताला बक्षीस का दिले नाही, याचे रहस्य आता सर्वांना समजले. सीतामाई गालातल्या गालात हसू लागल्या.

हनुमंतासारखा पुत्र आणि सीतेसारखी माता.मग त्या दोघांच्या स्नेहाबद्दल काय सांगायचे ? हजारो दासदासी सीतेच्या सेवेसाठी होत्या. तिच्या केवळ इशाऱ्याने जे म्हणेल ते होत होते. परंतु एवढ्यानेही तिचे समाधान होत नव्हते. आपल्या लाडक्या पुत्राला - हनुमंताला - आपण स्वत: स्वयंपाक करून जेऊ घालावे, असे सीतामातेच्या मनात आले. अनेक प्रकारचे पदार्थ बनविले. हनुमान जेवायला बसला. मातेच्या हातचा स्वयंपाक किती गोड असतो. हनुमान जेऊ लागला. त्याला कळलेच नाही की, आपण किती जेवलो. सर्व स्वयंपाक संपायला आला; परंतु हनुमान काही पुरे म्हणेना. सीतामातेला हनुमंताच्या या कृत्याचे नवल वाटले. तिने निरुपायाने प्रभूंचे स्मरण केले. हनुमंताच्या वेषात भगवान शंकर स्वत: भोजन करीत आहेत, असे सीतेने पाहिले. प्रलयाच्या वेळी संपूर्ण विश्वाला खाऊन टाकणारा महाकाळाचाही काळ हनुमान ! त्याचे पोट थोड्याशा पदार्थांनी कसे भरू शकणार ? तिने मर्यादापूर्वक हनुमंताची स्तुती केली. तिने हनुमंताच्या पाठीमागून जाऊन त्याच्या मस्तकावर 'ॐ नम: शिवाय' लिहिले आणि मग पदार्थ वाढले. आता मात्र हनुमान तृप्त झाला. अशा प्रकारे स्वत: सीतामातेने हनुमंताला शिवरूपात स्वीकारले.



भगवान रामाची सर्व सेवा हनुमानच करायचा. तो आपल्या कामात एवढा दक्ष असायचा की, दुसऱ्याला सेवेची संधीच मिळत नसे. भरत, शत्रुघ्न आणि लक्ष्मणही भगवंताच्या सेवेसाठी वाट पाहात असत. शेवटी त्यांनी एक उपाय शोधून काढला. तो असा की, अशी दिनचर्या बनवायची की त्यामुळे जीमध्ये भगवंताच्या सर्व सेवांची वाटणी व्हावी आणि आपण आपली वेळ आणि काम ठरवावे. हनुमंताला त्यात कोणतेही स्थान ठेवायचे नाही. योजना तयार झाली आणि सर्वांनुमते मान्य झाली. सीतामातेकडून ती योजना भगवान रामांच्या पुढे सादर केली गेली. योजना पाहून भगवंतांनी मृदू हास्य केले.

त्यांनी हनुमंताला दाखवून विचारले, 'हनुमंता ! सांग, तुला ही योजना पसंत आहे काय ? ' हनुमंत म्हणाले, 'भगवन, सर्वांची मान्यता आणि मातेची शिफारस असेल तर आपण हिचा स्वीकार करावा. यात जे सेवाकार्य नसेल ते माझे असेल.' भगवंतानी बाकी सर्व लोकांना म्हटले, बंधूंनो ! खूप विचार करून पाहून घ्या.' सर्वांनी पाहिले, कोणतेही काम सुटले नव्हते. सर्वांनी हनुमंताची गोष्ट मान्य केली. ती योजना भगवंतांनी मंजूर केली.

हनुमंताने सांगितले, 'भगवन ! दरबाराची अशी प्रथा आहे की, जेव्हा महाराज जांभई देऊ लागतील, तेव्हा चुटकी वाजवायची. तर हे काम माझे राहील. सर्वांना हे मामुली काम वाटले आणि भगवंतांनीही हसून मान्यता दिली. हनुमंताला सेवेविषयी किती सूक्ष्म ज्ञान आहे, हे पाहून भरत अवाक झाला.

आता हनुमंताचे काम ठरले. भगवंत चालत फिरत असतील, खातपीत असतील, तेव्हा हनुमान नेहमी त्यांच्याबरोबर राहू लागला. भगवान कुठे निघाले की हनुमान त्यांच्या पुढे, पाठीमागे तोंड करून पाहात चालायचा. जेव्हा भगवान झोप घेत, तेव्हा तो थोडा लांब उभा राहून भगवंतांचा मुखचंद्र न्याहाळत असे. कोणी कोणी त्याला या बाबतीत विरोध केला, तर तो त्यांना असे म्हणून निरुतर करीत असे की, प्रभूला केव्हा जांभई येईल, हे काय सांगता येते ? सीतामातेलाही भगवंतांच्या सेवेत गैरसोय होऊ लागली. लक्ष्मण आणि शत्रुघ्न तर घाबरून गेले. भगवान राम खूप हसत होते. शेवटी महाराणी सीतामातेच्या सांगण्यानुसार भगवंतांनी नवी योजना बदलली आणि पुन्हा हनुमान पूर्वीप्रमाणे निरंतर सेवा करू लागला.



भरत, शत्रुघ्न इत्यादी सर्वांची अशी कल्पना होती आणि ती गोष्ट खरीही होती की, भगवान राम हनुमंतावरच सर्वापेक्षा अधिक स्नेह करतात. जेव्हा त्यांना एखादी गोष्ट भगवंतांना विचारायची असेल, तेव्हा ते हनुमानामार्फतच विचारून घेत असत. हनुमान स्वत:ही भगवंतांना आणि सीतामातेला अनेक प्रकारचे प्रश्न विचारीत असे आणि जीव, शिव

इत्यादीसंबंधीचे तत्त्वज्ञान प्राप्त करून घेत असे. भगवान रामांनी त्याला अनेक वेळा तत्त्वज्ञानाचा उपदेश केला होता आणि वेदांताचे संपूर्ण रहस्य समजाविले होते. अध्यात्मरामायणाचे प्राथमिक प्रसंग असेच आहेत. ब्रह्मांड पुराणातही ही कथा आली आहे की, भगवंतांनी श्रीकृष्ण अवतारामध्ये जो उपदेश अर्जुन आणि उद्धवाला केला आहे, तोच उपदेश श्रीरामावतारामध्ये अंजनीपुत्र हनुमानाला केला आहे. हनुमान ज्ञानाची मूर्ती होता. या गोष्टीचे प्रमाण कितीतरी प्रसंगांतून मिळते. तो भगवान शिवच तर होता ! त्याच्यासाठी आश्चर्याची गोष्ट कुठली ?

कधी कधी हनुमंताला खूप सेवा करीत असताना पाहून भगवान म्हणत, 'हनुमाना ! तू तर माझेच स्वरूप आहेस. तुला एवढी सेवा करण्याची काय आवश्यकता आहे ? तू आरामात राहा.' हनुमान म्हणे, 'प्रभो ! आपले म्हणणे सत्य आहे, परंतु सेवा करण्यामुळे मी आपले स्वरूप पाहात नाही काय ? सेवेच्या वेळी मी प्रसन्न असत नाही काय ? शारीरिकदृष्ट्या मी आपला सेवक आहे.शरीर नेहमी आपल्या आणि आपल्या भक्तांच्या सेवेत राहावे, हाच त्याचा उपयोग आहे. जीव-दृष्टीने मी आपला अंश आहे. मी आपल्या सान्निध्यात राहावे, आपणापासून दूर होऊ नये, असे वाटणे हे स्वाभाविकच आहे. तत्त्वदृष्टीने तर मी आपले स्वरूपच आहे. त्यादृष्टीने काय सांगायचे आणि काय ऐकायचे ?'*

हनुमंताची अशी वचने ऐकून भगवान फारच संतुष्ट होत असत.



भगवान रामाचा अश्वमेध यज्ञाचा घोडा सोडला गेला. शत्रुघ्न, पुष्कल, लक्ष्मीनिधी इत्यादी मोठे मोठे वीर त्याच्या रक्षणासाठी नियुक्त झाले. हनुमान सुद्धा त्यांच्याबरोबर होता. अनेक ठिकाणी मोठमोठी युद्धे झाली. हनुमंताने त्यात केवढी तत्परता दाखविली, किती वीरतेने युद्ध केले, हे तर पद्मपुराणाच्या पातालखंडाचा तो भाग वाचल्यावरच समजणार. येथे त्यातील काही घटना

*देहदृष्ट्या तु दासोऽहं जीवदृष्ट्या त्वदंशकः।
आत्मदृष्ट्या त्वमेवाहमिति मे निश्चिता मतिः॥

नमुना म्हणून देत आहोत.

चक्रांका नगरीचा राजा सुबाहू याच्याशी युद्ध होत होते. पुष्कळसे वीर मारले गेले, अनेकजण घायाळ झाले. अंतिम युद्ध सुबाहू आणि हनुमानाचे चालले होते. हनुमंताची एक लाथ सुबाहूच्या छातीवर लागली आणि तो मूर्च्छित झाला. मूर्च्छेमध्ये सुबाहूने पाहिले की, मी अयोध्येत आहे.भगवान राम शरयू नदीच्या काठावर यज्ञ करत आहेत आणि कोटी कोटी ब्रह्मांडांचे अधिपती ब्रह्मदेव इत्यादी त्यांची स्तुती करीत आहेत. नारदादी ऋषिगण वीणा, पखवाज वगैरे वाजवून त्यांच्या गुणांचे वर्णन करीत आहेत आणि आपण शरीर धारण करून भगवंतांचे यशोगान करीत आहोत. त्यांचे ते शामसुंदर रूप पाहून सुबाहू मुग्ध झाला. त्याच अवस्थेत बराच काळ पडून राहिला.

जेव्हा तो शुद्धीवर आला, तेव्हा त्याचे अज्ञान नष्ट झाले होते. त्याने एका ऋषीच्या शापाची कथा ऐकवून हनुमंताचे फार मोठे माहात्म्य वर्णन केले आणि सांगितले, 'यांच्याच चरणस्पर्शाने मला रामतत्त्वाचे ज्ञान झाले आहे. आता युद्ध बंद करा आणि भेट देण्याच्या वस्तू घेऊन सर्व जण अयोध्येस चला. भगवान रामांच्या यज्ञात सेवाकार्य करा.' हनुमान इत्यादींची पूजा करून ते सर्व अयोध्येला आले आणि हनुमंत यज्ञाच्या घोड्याबरोबर पुढे निघाला.

जेव्हा तो घोडा देवपूरच्या शिवभक्त असलेल्या वीरमणी राजाने बांधला, तेव्हा फार मोठे युद्ध झाले. वीरमणीच्या भक्तीवर प्रसन्न होऊन भगवान शंकरांनी स्वतः युद्ध केले आणि शत्रुघ्न, पुष्कल इत्यादी सर्व वीर मूर्च्छित तसेच मृतप्राय झाले. केवळ हनुमानच युद्ध करीत राहिला. भगवान शंकराचीच लीला होती. तोच आपले भक्त आणि भगवान दोघांच्या बाजूने युद्ध करीत होता. दोन्हीकडेही भगवान शंकर; मग सांगा बरे कोण हरणार ? हनुमान क्रोधाने म्हणाला, 'मला वाटले होते शंकर रामाचे भक्त आहेत, परंतु तुमची भक्ती कळली ! आम्ही रामाचा यज्ञ पूर्ण होण्यासाठी घोड्याचे रक्षण करीत आहोत आणि तुम्ही त्यात विघ्न निर्माण करून युद्ध करीत आहात ?' शंकर म्हणाले, 'बंधू, खरे आहे. माझ्याकडून भगवंताची भक्ती कुठे घडते ? परंतु तुझे बोलणे मला आनंद देत आहे. तू मला भगवंताचे स्मरण तर करून

दिलेस, परंतु मी काय करू ? मी वीरमणीला भक्तीने वश झालो आहे. मला त्याच्या बाजूने लढावेच लागेल.'

फार मोठे जोरदार युद्ध झाले. हनुमंताच्या प्रहाराने भगवान शंकराच्या रथाचा चुराडा झाला. त्याची आयुधे निष्फळ बनली. त्याचे शरीर जर्जर झाले. नंदी पळू लागला. शंकराने हनुमंताला बोलावून म्हटले, 'वीरा ! तू धन्य आहेस. तुझी भगवद्‌भक्ती धन्य आहे. मी तुझे शौर्य आणि भगवत्परायणता पाहून प्रसन्न झालो आहे. जे वरदान यज्ञ व तपाने प्राप्त होऊ शकत नाही, ते मी तुला देण्यास तयार आहे. माग, माग. तुझी जी इष्ट गोष्ट असेल ती मागून घे.'

हनुमान म्हणाले,'शंकरा ! भगवान रामाच्या कृपेने मला कोणत्याही वस्तूची कामना नाही; तरीपण आज तुम्ही युद्धात माझ्यावर प्रसन्न झाला आहात, म्हणून मी तुमच्या कडून काही काम करून घेईन. पहा, युद्धात पुष्कल हा मृत्युमुखी पडला आहे. शत्रुघ्न मूर्च्छित झाला आहे; सैनिक जखमी होऊन रणांगणावर पडला आहेत; तुम्ही आपल्या गणांसह यांचे रक्षण करा. मी औषधी आणण्यासाठी द्रोणाचलावर जातो. देवतांनी जर विरोध केला तर तेथेही युद्ध करावे लागेल, विलंब होईल, अशी शक्यता आहे. तोपर्यंत या वीरांचे काहीही अनिष्ट होऊ नये.' शंकरांनी मान्य केले आणि हनुमंत निघाला.

हनुमानाने क्षीरसागराजवळ जाऊन द्रोणाचलास आपल्या शेपटीत गुंडाळून घेतले व त्याला उपटून घेऊन निघणार, एवढ्यात द्रोणाचलाच्या रक्षक देवतांनी हनुमंतावर आक्रमण केले. परंतु हनुमंतासमोर त्यांचे काही चालले नाही. ते घायाळ होऊन पळाले. जेव्हा त्यांनी इंद्राला जाऊन सांगितले, 'एक वानर द्रोणाचल घेऊन जात आहे आणि आमचे अस्त्र त्याच्यावर चालत नाही.' तेव्हा ते सर्व घाबरून त्यांचे कुलगुरू बृहस्पती यांचेकडे गेले. बृहस्पतीने हनुमंताचा पूर्ण परिचय करून देऊन त्याला प्रसन्न करण्याची प्रेरणा केली. इंद्र म्हणाला, 'भगवान, हनुमान जर द्रोणाचल उपटून नेईल, तर मग आमच्या देवता तर मरून जातील. कारण तोच आमचा जीवनाधार आहे. ज्यामुळे हनुमंताचेही काम सिद्धीला जावे आणि आमच्या औषधीही सुरक्षित राहाव्यात

असा काही उपाय करा.'

बृहस्पती हा इंद्र आणि देवता यांना बरोबर घेऊन हनुमंताजवळ आला. त्याच्याजवळ येऊन रडला, विनवणी केली. आपल्या अपराधांची क्षमा मागितली आणि त्याची अभिलाषा पूर्ण होण्याचे वरदान देऊन त्याला मृतसंजीवनी औषधी दिली. हनुमान ती औषधी घेऊन रणभूमीवर पोहोचला. चोहोकडे हनुमंताचा जयजयकार होऊ लागला. तो औषधी घेऊन पुष्कलाजवळ गेला. पुष्कल मेला होता. त्याने औषधीचा प्रयोग करून म्हटले, 'मी मन, वाणी आणि कर्माने जर भगवान रामालाच केवळ ओळखत असेन, त्यांच्याच आज्ञेचे पालन करीत असेन आणि माझ्या दृष्टीने त्यांच्याशिवाय इतर कोणतीही वस्तू श्रेष्ठ नसेल, तर या औषधीने पुष्कल जिवंत होवो'.*

मस्तक धडाला जोडताच पुष्कल जिवंत झाला आणि शंकराशी लढण्यासाठी धावला.

हनुमान शत्रुघ्नाजवळ गेला. शत्रुघ्न मूर्च्छित अवस्थेत 'राम-राम', 'रघुनंदन, रघुनंदन' इत्यादी म्हणत होता आणि कधी कधी त्यांच्या लीलांचे स्मरण ही करीत होता. (हनुमानाने औषधीचा उपयोग करत म्हटले) 'भगवंताच्या कृपेने मी जर नित्यब्रम्हचारी असेन आणि माझे ब्रह्मचर्य कधी भंग झाले नसेल, तर शत्रुघ्न आता जिवंत होऊ दे.'**

असे म्हणताच शत्रुघ्न उठून बसला आणि 'शिव कोठे आहे ? त्याला मी आत्ता मारून टाकतो.' असे म्हणत युद्धभूमीकडे धावला. पुन्हा जोरदार युद्ध झाले. वीरमणी मूर्च्छित झाला. शंकर आणि शत्रुघ्न लढू लागले. जेव्हा शंकराच्या बाणांनी शत्रुघ्न व्याकुळ झाला, तेव्हा हनुमान म्हणाला, 'आता तू आपल्या भावाचे स्मरण कर. मग काम होईल.' शत्रुघ्नाने तसेच केले आणि भगवान राम तेथे उपस्थित झाले. मग तर शंकरांनी फार मोठ्या श्रद्धा-भक्तीने

* यद्यहं मनसा वाचा कर्मणा राघवं प्रति।
जानामि तर्हिं एतेन भेषजेनाशु जीवतु॥

** यद्यहं ब्रह्मचर्यं च जन्मपर्यन्तमुद्यतः।
पालयामि तदा वीरः शत्रुघ्नो जीवतु क्षणात्॥

त्यांची स्तुती केली आणि आपल्या या अक्षम्य अपराधाबद्दल क्षमायाचना केली.

भगवान राम म्हणाले, 'देवाधिदेव, महादेव ! आपण फार मोठे चांगले काम केले आहे. आपल्या भक्तांचे रक्षण करणे हा देवांचा धर्मच आहे. तुम्ही माझ्या हृदयात आहात आणि मी तुमच्या हृदयात आहे. आपण दोन थोडेच आहोत? आपणां दोघांत ज्यांना भिन्नता वाटते, ते नरकात जातात. जे तुमचे भक्त आहेत, तेच माझे भक्त आहेत. माझे भक्तही अत्यंत भक्तिपूर्वक तुम्हांला नमस्कार करतात.'*

भगवंतांनी सर्व मेलेल्या आणि घायाळ झालेल्या वीरांना स्पर्श करून जिवंत केले. वीरमणी राजा आपले सर्वस्व समर्पित करून रामाचा भक्त झाला. हनुमान घोडा घेऊन पुढे निघाला.



जेव्हा भगवान राम हे सर्व वानर-अस्वलांना निरोप देऊ लागले आणि हनुमंताचीही पाळी आली, तेव्हा त्याने भगवंताच्या पायावर लोळण घेतली. त्याने प्रार्थना केली, 'भगवन ! मी आपल्या चरणापाशीच राहीन.' भगवंतांनी मान्यता दिली. अशा भक्तांना भगवान कसे बरे सोडतील ? भगवंतांच्या लीलासमाप्तीची वेळ आली. तेव्हा भगवंतांनी हनुमंताला बोलावून म्हटले, 'हनुमाना ! आता तर मी आपल्या लोकी जात आहे, परंतु तू दुःखी होऊ नकोस. हे अप्रिय काम तुला करावे लागेल. तू पृथ्वीवर राहून शांती, प्रेम आणि ज्ञानाचा प्रसार कर. जेव्हा तू माझे स्मरण करशील, तेव्हा मी तुझ्यासमोर प्रगट होईन. जेथे जेथे माझी कथा, माझे कीर्तन असेल, तेथे तेथे तू उपस्थित

* देवानामयमेवास्ति धर्मो भक्तस्य पालनम् ।
त्वया साधु कृतं कर्म यद्भक्तो रक्षितोऽधुना ॥
ममासि हृदये शर्व भवतो हृदये त्वहम् ।
आवयोरन्तरं नास्ति मूढाः पश्यन्ति दुर्धियः ॥
ये भेदं विदधत्यद्धा आवयोरेकरूपयोः ।
कुम्भीपाकेषु पच्यन्ते नराः कल्पसहस्रकम् ॥
ये त्वद्भक्तास्त एवासन्मद्भक्ता धर्मसंयुताः ।
मद्भक्ता अपि भूयस्या भक्त्या तव नतिङ्कराः ॥

राहा. मी तुझ्यापासून वेगळा थोडाच होत आहे ? ही तर एक माझी लीला आहे.'

हनुमंताने हात जोडून म्हटले, 'प्रभो ! मी आपल्या आज्ञेप्रमाणे पृथ्वीवर राहीन. जेथे जेथे आपली कथा असेल, तेथे तेथे जाऊन ती ऐकेन. माझ्या जीवनाचा तोच आधार असेल.' भगवान फारच प्रसन्न झाले. भगवान रामाने एका अशाच प्रसंगी हनुमानाला म्हटले होते,'हनुमंता ! या लोकी जोपर्यंत माझी कथा राहील, तोपर्यंत तुझी कीर्ती आणि तुझे जीवन राहील, जोपर्यंत हे जग राहील, तोपर्यंत माझी कथा राहील. तू माझेवर जे मोठे उपकार केले आहेस, त्यांपैकी एकेकाच्या बदली मी माझे प्राण दिले, तरीही तुझ्या उपकाराची फेड मी करूच शकणार नाही. तुझ्या उपकारांची परतफेड मी करू शकत नाही. चांगलेच आहे. तुझ्या जीवनात कधी अशी संधीच येऊ नये की, तुला प्रत्युपकाराची आवश्यकता भासावी. कारण मनुष्य विपत्तीतच प्रत्युपकाराला पात्र होतो.'*

भगवान रामांनी आपली लीला समाप्त केली. परंतु त्यांचे भक्त भगवान शंकर यांची लीला चालूच राहिली. कारण 'राम ते अधिक राम कर दासा।'

(४)

भगवान राम परमधामास गेल्यानंतर हनुमंताचे एकच काम राहिले. ते म्हणजे भगवंताचे नाम, त्यांच्या लीला आणि त्यांच्या गुणांचे कीर्तन व श्रवण ! जेथे जेथे सत्संग होतो, तेथे तेथे हनुमान उपस्थित असतो. बहुतेक

*चरिष्यति कथा यावदेषा लोके च मामिका।
तावत्ते भविता कीर्तिः शरीरेऽप्यसवस्तथा ॥
लोका हि यावत्स्थास्यन्ति यावत्स्थास्यति मे कथा।
एकैकस्योपकारस्य प्राणान् दास्यामि ते कपे ॥
शेषस्येहोपकाराणां भवाम ऋणिनो वयम् ।
मदङ्गे जीर्णतां यातु यत्त्वयोपकृतं कपे ॥
नरः प्रत्युपकाराणामापत्स्वायाति पात्रताम् ।
- वाल्मीकीय रामायण

आर्ष्टिषेण ऋषीबरोबर किंपुरुषवर्षात राहूनच तो भगवंताचे गुणानुवाद ऐकत असतो. गंधर्वांच्या स्वरलहरी जेव्हा आपल्या रसाने त्रिभुवनाला उन्मत्त करून टाकत होत्या, तेव्हा हनुमान त्यांच्या अमृतमय संगीतातून बाहेर पडलेल्या भगवान रामाच्या लीलेचा साक्षात अनुभव घेत होता. अनेक युगे होऊन गेली, परंतु एक क्षणभरही त्याला भगवंताची विस्मृती झाली नाही. भगवंताव्यतिरिक्त दुसरा कोणीही त्याच्या दृष्टीपुढे आला नाही.

वैवस्वत मन्वंतराच्या अठ्ठाविसाव्या द्वापार युगात भगवान श्रीकृष्णाचा अवतार झाला. श्रीकृष्ण आणि श्रीराम एकच आहेत, दोन नव्हेत. मग ते आपल्या परम प्रिय भक्त हनुमानाशिवाय कसे राहतील ? त्यांनी हनुमंताला बोलावण्याचा संकल्प केला. परंतु त्याबरोबरच काही लीलाही झाली पाहिजे, हनुमंताचे महत्त्व प्रकट झाले पाहिजे. आपले म्हणविणाऱ्यात जे दोष, जे दुर्गुण आले आहेत, ते नाहीसे केले पाहिजेत. भगवंताचा संकल्प होताच हनुमान द्वारकेजवळच एका उपवनात आला.भगवन्नामाचे संकीर्तन करीत झाडाची फळे खाऊ लागला. आणि फांद्या तोडू लागला. त्यावेळी सत्यभामेसाठी भगवंताने पारिजातक हरण करून आणला होता. सत्यभामेला असा गर्व होता की, भगवंताचे सर्वांत अधिक प्रेम माझ्यावरच आहे. मी सर्वांपेक्षा सुंदर आहे. तिने एके दिवशी बोलता बोलता श्रीकृष्णास म्हटले सुद्धा 'ती सीता काय माझ्यापेक्षा अधिक सुंदर होती की जिच्यासाठी तुम्ही वनोवनी भटकत होता ?' भगवान गप्प राहिले. सुदर्शन चक्राच्या मनातही गर्व झाला होता की, मी इंद्राच्या वज्राला हरविले. गरुडही विचार करत होता की, माझ्या सहाय्यानेच श्रीकृष्णाने इन्द्रावर विजय मिळविला. भगवान श्रीकृष्णांनी विचार केला की, तिघांचाही गर्व हरण करावा. हे माझे असून अभिमानी असावेत, हे मला सहन होणार नाही. धन्य भगवंतांची कृपा ! भगवंतांनी गरुडाला बोलावून आज्ञा दिली की, 'गरुडा ! द्वारकेच्या उपवनात एक वानर आले आहे. त्याला पकडून आण.पहा, त्याला पकडण्याची तुझ्यात हिंमत असेल तर तू एकटा जा. नाहीतर सैन्य घेऊन जा.' गरुडाच्या मनात आले की, एक तर भगवान मला सामान्य वानर पकडण्यासाठी पाठवत आहेत आणि दुसरे, सेनाही बरोबर घेऊन जाण्यास सांगत आहेत, हा माझा केवढा अपमान आहे ? मी त्या

वानराचा चुरा करून टाकीन. गरुडाने एकट्याने जाऊन पाहिले की, हनुमान आपल्याकडे पाठ करून फळे खात आहे आणि मोठ्या धुंदीत 'राम राम' या नामाचे कीर्तन करीत आहे. त्याने प्रथम रागावून, दटावून हनुमंताला घेऊन जाण्याचा प्रयत्न केला. परंतु हनुमंताने त्याला दाद दिली नाही. गरुडाने त्याच्यावर आक्रमण केले, तेव्हा सुरवातीला बराच वेळापर्यंत, जसे लहान लहान पक्ष्यांबरोबर खेळतात, तसे हनुमान खेळत राहिला; परंतु जेव्हा गरुडाने हे मानले नाही, तेव्हा त्याने आपल्या शेपटीत त्याला गुंडाळून थोडे आवळले. तेव्हा गरुड तडफडू लागला. त्याने भगवान श्रीकृष्णाचे नाव सांगून म्हटले, 'त्यांच्या आज्ञेने मी आलो आहे. त्यांनी तुम्हांला बोलावले आहे. ते साक्षात नारायण आहेत. चला.' हनुमंताने गरुडाला सोडून देऊन म्हटले, ' हे बंधू, जरी राम आणि कृष्ण यांच्यात कोणताही भेद नाही, दोघेही एकच आहेत, तरी पण मी सीतानाथ श्रीरामाचा आहे. माझ्या हृदयात त्यांनाच स्थान आहे. मी श्रीकृष्णाजवळ कशाला जाऊ ?' असे म्हणून जणू काही त्याने भगवंताच्या लीलेमध्ये सहकार्य केले.

अजून गरुडाचा गर्व नष्ट झाला नव्हता. तो विचार करीत होता, ' जर मी पकडला गेलो नसतो, तर हनुमानाला जबरदस्तीने नेऊ शकलो असतो.' त्याने पुन्हा त्याच्यावर आक्रमण केले. अभिमान माणसाला आंधळा करीत असतो. श्रीकृष्णाचा दूत म्हणून हनुमंताने त्याच्यावर जोराने आघात केला नाही, परंतु हळूच पकडून त्याला समुद्राकडे फेकून दिले. समुद्रात पडल्यावर गरुडाला दिशाभ्रम झाला. पुष्कळ वेळ तो तेथेच तडफडत राहिला. जेव्हा त्याने भगवंताचे स्मरण केले, तेव्हा कोठे त्याला द्वारकेचा प्रकाश दिसला आणि तो श्रीकृष्णाजवळ आला. सर्व वृत्तांत ऐकून श्रीकृष्णाला खूप हसू आले. अजूनही गरुडाच्या मनात वेगाने उडण्याचा गर्व शिल्लकच होता. तो विचार करीत होता की, उडण्यात माझी बरोबरी वायूदेखील करू शकणार नाही. सामर्थ्याने माझ्यापेक्षा हनुमान अधिक भलेही असो.

भगवान म्हणाले, 'गरुडा ! यावेळी जाऊन तू हनुमंताला म्हण, 'तुझे इष्ट देव भगवान श्रीराम- तुला बोलावीत आहेत, लवकर चल ! त्याला तुझ्या बरोबरच घेऊन ये. आता तो तुला काहीही म्हणणार नाही. तुझा फार मोठा

सन्मान करील.' गरुड पुन्हा जाण्यास जरी भीत होता, तरीही आपली उडण्याची शक्ती दाखविण्यासाठी तो गेला. भगवंतांनी सत्यभामेला सांगितले, 'सीतेचे रूप धारण करून ये. हनुमान येत आहे.' चक्राला म्हटले, 'सावधपणे पहारा दे. द्वारकेत कोणाचाही प्रवेश होता कामा नये.' सुदर्शन चक्र सावधपणे पहारा देऊ लागले आणि सत्यभामा नटून थटून आपल्या सौंदर्याच्या गर्वात ताठ्याने सीतेचे रूप धारण करून बसली. भगवान श्रीकृष्ण धनुष्यबाण धारण करून श्रीरामचंद्र बनले.

यावेळी हनुमानाजवळ जाण्यास गरुडाची हिंमत झाली नाही. त्याने दुरूनच म्हटले, 'भगवान श्रीराम तुम्हांला लवकर बोलावीत आहेत. माझ्या बरोबरच येऊ शकत असाल तर चला, नाही तर माझ्या खांद्यावर बसा. मी तुम्हांला घेऊन जातो.' हनुमंत मोठ्या आनंदाने म्हणाला, 'श्रीरामांनी मला बोलावले आहे, हे माझे मोठे भाग्य आहे. तुम्ही पुढे व्हा, मी आलोच.' गरुडाला वाटले, 'हे काय सांगतात ? हे माझ्यामागून निघून किती उशीरा येणार !' परंतु तो घाबरलेला होता. त्यामुळे हनुमंताला पुन्हा सांगण्याची त्याची हिंमत झाली नाही. तो गुपचुप निघाला. तो विचार करीत होता की भगवंताजवळ जाऊन मी आपली तीव्र गती दाखवून देईन. हनुमान गरुडापेक्षा फार् लवकर द्वारकेत पोहोचला. हनुमंताच्या दृष्टीने ती द्वारका नव्हती, अयोध्या होती. फाटकावर चक्राने अडवले आणि म्हटले, ' मी तुम्हांला जाऊ देणार नाही.' हनुमान म्हणाले, ' तू भगवंताच्या दर्शनामध्ये विघ्न आणीत आहेस.' असे म्हणून त्याला पकडून तोंडात टाकले. भगवंताच्या महालात जाऊन त्याने पाहिले की, भगवान श्रीराम सिंहासनावर विराजमान आहेत. त्याला सीतामातेचे दर्शन झाले नाही. हनुमंताने भगवंताच्या चरणी साष्टांग प्रणाम करून त्यांना विचारले, 'महाराज ! आज सीतामाई कुठे आहेत ? त्यांच्या स्थानावर ही कोण बसली आहे ? आपण कोणत्या दासीला एवढा आदर दिला आहे ?' सत्यभामा लज्जित झाली. तिचा सौंदर्यमद नष्ट झाला. भगवान म्हणाले, 'हनुमाना ! तुला कोणी अडवले नाही का ? तू येथे कसा आलास ?' हनुमंताने तोंडातून चक्र काढून पुढे ठेवले. चक्र सामर्थ्यहीन झाले होते. गरुड जेव्हा धापा टाकीत आला, त्यावेळी त्याने पाहिले की, हनुमान तर

माझ्या अगोदरच येऊन पोहोचला आहे. त्याने मान खाली घातली. अशा प्रकारे हनुमंताला निमित्त करून भगवंतांनी तिघांचेही गर्वहरण केले आणि हनुमंताला द्वारकेच्या पूर्वेकडील द्वारावर द्वारकापुरीच्या रक्षणासाठी रक्षक म्हणून नेमले.

पांडव काम्यकवनात असताना एके दिवशी द्रौपदीच्या पुढे हवेतून उडत एक फारच सुंदर आणि सुगंधित फूल येऊन पडले. द्रौपदीने भीमाला अशी आणखी फुले पाहिजेत, अशी विनंती केली. ज्या दिशेकडून फूल आले होते, त्या दिशेकडे फुले आणण्यासाठी भीम निघाला. भीमाला आपल्या सामर्थ्याचा फार मोठा अभिमान होता. तो कोणतेही काम करताना काही फारसा विचार करीत नसे. हनुमंताने विचार केला की भीम माझा भाऊ आहे. त्याच्या मनात गर्व असणे अयोग्य आणि यावेळी तो जिकडे जात आहे, तिकडे फार मोठा धोका आहे. कदाचित त्याच्या अज्ञानामुळे त्याचे अनिष्ट होऊ नये. हनुमान त्याच्या वाटेत येऊन पहुडला आणि त्याने आपली शेपूट लांबविली. भीमाने हनुमंताला ओळखले नाही. तो म्हणाला, 'हे वानरा ! आपली शेपूट आवरून घे. नाहीतर मी ती तोडून टाकीन.' हनुमंताने आपण आजारी व अशक्त असल्याचे भासवून म्हटले, 'हे बंधू, माझी शेपूट खूप मोठी आहे. तू यावेळी तरुण आहेस, सामर्थ्यवान आहेस. तेव्हा ही शेपटी एकतर ओलांडून जा किंवा तिला एका बाजूला उचलून ठेव.' भीम म्हणाला, 'तुझी शेपटी मग ती केवढीही मोठी असो, माझ्या मोठ्या भावाने जसा समुद्र ओलांडला होता, तशीच मी तुझी शेपटी ओलांडून गेलो असतो. परंतु सर्वांच्या शरीरात भगवान असतो, म्हणून कोणालाही ओलांडून जाणे योग्य नव्हे. मी तुझी शेपूट उचलून बाजूला ठेवतो.' त्याने अगोदर एक हात लावला. परंतु शेपूट हालली नाही. दोन्हीही हात लावले, तरीही ती जशीच्या तशीच राहिली. तो घामाघुम झाला. थकून गेला. परंतु शेपटी हलवू शकला नाही. आता भीमाला आठवण झाली. अभिमान नष्ट होताच त्याने हनुमंताला ओळखले. त्याला आपल्या कृत्याचा पश्चात्ताप झाला. त्याने क्षमा मागितली. हनुमंताने मोठ्या प्रेमाने त्याला आलिंगन देऊन त्याला रामकथा सांगितली. भीमाच्या फार आग्रहामुळे हनुमंताने आपले ते भीषण रूप दाखविले की, जे त्याने समुद्र उल्लंघताना घेतले होते. पुन्हा तो

आपल्या लहान रूपात आला आणि त्याने भीमाला अनेक प्रकारे उपदेश केला. तो म्हणाला, 'असा अभिमान कधी करू नकोस. माझ्या भेटीचा वृत्तांत कोणालाही सांगू नकोस आणि जेव्हा संकट येईल, तेव्हा माझे स्मरण कर. जर तू म्हणत असशील तर मी हस्तिनापुराला जाऊन संपूर्ण नगर आत्ताच्या आत्ता नष्ट करून टाकतो आणि धृतराष्ट्राच्या पुत्रांना मृत्युदंड देतो. दुर्योधनाला बांधून आणतो. जे म्हणशील ते करण्यास मी तयार आहे.' भीम म्हणाला, 'आपले साहाय्य मिळाल्याने आम्ही सनाथ झालो. आपल्या साहाय्यानेच आम्ही शत्रूंना जिंकू शकू.' हनुमान म्हणाला, 'भीमा ! जेव्हा तू शत्रूंच्या सैन्यात घुसून सिंहनाद करशील, तेव्हा अर्जुनाच्या ध्वजावर बसून मी देखील अशी गर्जना करीन की तुझे शत्रू ती गर्जना ऐकून मृतप्राय होतील.' हनुमंताने भीमाला आलिंगन दिले आणि त्यानंतर तो अंतर्धान पावला. त्याने सांगितलेल्या मार्गाने पुढे जाऊन भीमाने ती फुले मिळविली.



हनुमंतामध्ये तिळमात्र अभिमानाचा गंध नव्हता. त्याच्या जीवनात कधीच अभिमान दिसून आला नाही. म्हणून भगवान आपल्या भक्तांचा अभिमान दूर करण्याचे काम बहुतेक हनुमंताकडूनच करून घेतात. असे म्हणतात की अर्जुनालाही एकवेळ आपल्या बाणांच्या शक्तीचा अभिमान झाला होता. त्याने सहज बोलता बोलता एकदा श्रीकृष्णाला म्हटले, 'तुम्ही रामावतारामध्ये समुद्रावर पूल बांधण्याचा एवढा खटाटोप का केला ? त्यापेक्षा बाणांचा पूल बांधायचा होता. बिचाऱ्या वानरांना विनाकारण त्रास दिला.' भगवान हसू लागले. त्यांचे हसणे तर लोकांना भुलविणारी माया आहे.

भगवान म्हणाले, 'ठीक आहे, तू बाणांनी समुद्राच्या एका छोट्या भागावर पूल बांध. मग मी तुझ्या शंकेचे निरसन करीन.' अर्जुनाने तत्काळ पूल तर बांधला. भगवंताने हनुमंताचे स्मरण केले. तो ताबडतोब आला. भगवंताच्या आज्ञेने तो बाणांच्या पुलावर चढला. चढताच पूल करकर वाजून तुटू लागला. तो पुलावरून उतरला. भगवंतांच्या पाठीवर रक्त लागलेले अर्जुनाने पाहिले. विचारल्यावर समजले की जर भगवंतांनी आपली पाठ लावून त्या पुलाला टेकू दिला नसता, तर तो पूल हनुमंतासह रसातळाला गेला असता आणि अर्जुनाचेही फार मोठे हसे झाले असते. भगवान म्हणाले.

'हनुमंतासारखे अनेक वानर होते. ते बाणांच्या पुलावरून कसे गेले असते ?' अर्जुनाच्या लक्षात आले. त्याचा अभिमान नष्ट झाला. अर्जुनाने भगवंतांच्या आज्ञेने हनुमंताची मोठी आराधना केली. त्याच्या मंत्राची पुरश्चरणे केली. तो मंत्र असा -

**'हनुमते रुद्रात्मकाय हुँ फट् !'** नदीच्या तीरावर, विष्णुमंदिरात, निर्जन स्थानावर अथवा एखाद्या पर्वतावर एकाग्रचित्ताने श्रीहनुमानाचे ध्यान करीत मंत्राचा एक लक्ष जप करावा.ध्यान असे आहे-

> **महाशैलं समुत्पाट्य धावन्तं रावणं प्रति।**
> **तिष्ठ तिष्ठ रणे दुष्ट घोररावं समुत्सृजन् ।।**
> **लाक्षारसारुणं रौद्रं कालान्तकयमोपमम्।**
> **ज्वलदग्निलसन्नेत्रं सूर्यकोटिसमप्रभम् ।।**
> **अंगदाद्यैर्महावीरैर्वेष्टितं रुद्ररूपिणम्।**
> **एवंरूपं हनूमन्तं ध्यात्वा यः प्रजपेन्मनुम्।।**

हनुमंताने वर दिला, 'मी नेहमी तुला मदत करीन आणि भावी युद्धात मी तुझ्या रथावर बसून तुझे रक्षण करीन.' असे म्हणतात की, महाभारतीय युद्धात अर्जुनाच्या बाणाने सर्वांचे रथ फार दूरदूर जाऊन पडत होते, परंतु कोणाच्याही बाणाने अर्जुनाचा रथ मागे हटत नव्हता. एकदा कर्णाच्या बाणाने अर्जुनाचा रथ काही थोडासा मागे हटला. त्यावेळी युद्धभूमीतच भगवन श्रीकृष्णाने कर्णाची खूप प्रशंसा केली. अर्जुनाने विचारले, 'भगवन, माझ्या बाणाने कर्णाचा रथ बराच मागे हटतो आणि त्याच्या बाणाने माझा रथ फारच थोडा मागे हटला आहे. मग त्यात एवढी त्याची प्रशंसा करण्याचे काय कारण आहे ?' भगवान म्हणाले, 'अर्जुना ! तुझ्या रथावर हनुमान बसला आहे, नाहीतर आतापर्यंत तुझा रथ भस्म झाला असता. हनुमान बसला असतानाही रथ मागे हटणे कर्णाच्या फार मोठ्या वीरतेचे लक्षण आहे.' अर्जुनाचे समाधान झाले. महायुद्धाच्या शेवटी जेव्हा हनुमंताने रथावरून उडी मारली, तेव्हा अर्जुनाचा रथ जळून खाक झाला. अर्जुन एवढ्या वीरतेने लढू शकला, हा हनुमंताचाच प्रताप होता.



श्रीकृष्णाचा मुलगा प्रद्युम्न हा दिग्विजयासाठी निघाला होता. द्वारकेत अश्वमेध यज्ञ होणार होता. हा त्याचाच संकल्प होता. तो दिग्विजय करीत हिरण्मयखंडात पोहोचला. त्यावेळी त्याच्याबरोबर अर्जुनही होता आणि त्याच्या रथाच्या ध्वजावर हनुमान विराजमान होता. हिरण्मयखंडात नल-नील यांच्या वंशजांशी प्रद्युम्नाचे फार मोठे युद्ध झाले. अर्जुनही लढत होता. तेथील वीर वानर हे अर्जुन आणि प्रद्युम्नाचा रथ आपल्या शेपटीने गुंडाळून जमिनीवर आपटीत होते. फार मोठा संग्राम झाला. शेवटी हनुमानाने ध्वजावरून उडी मारली आणि त्याने आपल्या शेपटीत सर्व वानरांना गुंडाळून घेतले. हा हनुमान आहे, असे जेव्हा कळले, तेव्हा तेथील सर्व रहिवाशांनी मोठ्या श्रद्धाभक्तीने हनुमान, प्रद्युम्न आणि अर्जुन यांची पूजा केली. अनेक प्रकारच्या वस्तू भेट म्हणून दिल्या. मग तेथून त्या लोकांनी दुसरीकडे प्रस्थान केले.

हनुमान केवढा मोठा तत्त्ववेत्ता होता, याची माहिती रामरहस्य उपनिषदात मिळते. सनक, सनन्दन, सनत्कुमार व सनातन हे चारही भाऊ त्याच्याकडून राम-मंत्रांचे रहस्य प्राप्त करून घेतात. मोठमोठे ऋषी आणि प्रल्हाद हे त्याचे शिष्य आहेत. स्वतः भगवान रामाने त्याला उपनिषदांचे तत्त्व सांगितले आहे. त्याचे वर्णन मुक्तिकोपनिषदामध्ये आले आहे. इतरही पुराणांमध्ये मारुति-चरित्र विस्ताराने वर्णन केले गेले आहे. येथे त्याच्या जीवनातील काही थोड्या घटना संक्षिप्त स्वरूपात सांगितल्या आहेत. मारुती कुठेही गेलेला नाही, येथेच आहे. आजही आपल्या जवळच आहे. केवळ आपण त्याला ओळखू शकत नाही. याचे कारण आपली श्रद्धा आणि भक्ती यांचा अभाव हेच होय. तुलसीदास इत्यादी महात्म्यांनी याच युगात मारुतीचा साक्षात्कार करून घेतला आहे. आजही असे साधक आहेत की ज्यांनी मारुतीला प्राप्त करून घेतले आहे. शास्त्रात त्याच्या प्राप्तीसाठी अनेक मंत्र आणि अनुष्ठाने सांगितलेली आहेत. श्रद्धापूर्वक त्याचे अनुष्ठान करण्याने मारुतिरायाचे दर्शन होऊ शकते. त्याच्या स्मरणाने अंतःकरण शुद्ध होते. आणि त्याच्या कृपेने भगवत्प्राप्ती होते.



॥ श्रीहनूमते नमः ॥

# श्रीहनुमानचालीसा

## दोहा

श्रीगुरु चरन सरोज रज
निज मनु मुकुरु सुधारि।
बरनउँ रघुबर बिमल जसु
जो दायकु फल चारि॥
बुद्धिहीन तनु जानिके,
सुमिरौं पवन-कुमार।
बल बुधि बिद्या देहु मोहिं,
हरहु कलेस बिकार॥

## चौपाई

जय हनुमान ज्ञान गुन सागर। जय कपीस तिहुँ लोक उजागर॥
राम दूत अतुलित बल धामा। अंजनि-पुत्र पवनसुत नामा॥
महाबीर बिक्रम बजरंगी। कुमति निवार सुमति के संगी॥
कंचन बरन बिराज सुबेसा। कानन कुंडल कुंचित केसा॥
हाथ बज्र औ ध्वजा बिराजै। काँधे मूँज जनेऊ साजै॥
संकर सुवन केसरीनंदन। तेज प्रताप महा जग बंदन॥
बिद्यावान गुनी अति चातुर। राम काज करिबे को आतुर॥
प्रभु चरित्र सुनिबे को रसिया। राम लषन सीता मन बसिया॥
सूक्ष्म रूप धरि सियहिं दिखावा। बिकट रूप धरि लंक जरावा॥
भीम रूप धरि असुर सँहारे। रामचन्द्र के काज सँवारे॥

लाय सजीवन लखन जियाये। श्रीरघुबीर हरषि उर लाये॥
रघुपति कीन्ही बहुत बड़ाई। तुम मम प्रिय भरतहि सम भाई॥
सहस बदन तुम्हरो जस गावैं। अस कहि श्रीपति कंठ लगावैं॥
सनकादिक ब्रह्मादि मुनीसा। नारद सारद सहित अहीसा॥
जम कुबेर दिगपाल जहाँ ते। कबि कोबिद कहि सके कहाँ ते॥
तुम उपकार सुग्रीवहिं कीन्हा। राम मिलाय राज पद दीन्हा॥
तुम्हरो मंत्र बिभीषन माना। लंकेस्वर भए सब जग जाना॥
जुग सहस्र जोजन पर भानू। लील्यो ताहि मधुर फल जानू॥
प्रभु मुद्रिका मेलि मुख माहीं। जलधि लाँघि गये अचरज नाहीं॥
दुर्गम काज जगत के जेते। सुगम अनुग्रह तुम्हरे तेते॥
राम दुआरे तुम रखवारे। होत न आज्ञा बिनु पैसारे॥
सब सुख लहै तुम्हारी सरना। तुम रच्छक काहू को डर ना॥
आपन तेज सम्हारो आपै। तीनों लोक हाँक तें काँपै॥
भूत पिसाच निकट नहिं आवै। महाबीर जब नाम सुनावै॥
नासै रोग हरै सब पीरा। जपत निरंतर हनुमत बीरा॥
संकट तें हनुमान छुड़ावै। मन क्रम बचन ध्यान जो लावै॥
सब पर राम तपस्वी राजा। तिन के काज सकल तुम साजा॥
और मनोरथ जो कोइ लावै। सोइ अमित जीवन फल पावै॥
चारों जुग परताप तुम्हारा। है परसिद्ध जगत उजियारा॥
साधु संत के तुम रखवारे। असुर निकंदन राम दुलारे॥
अष्ट सिद्धि नौ निधि के दाता। अस बर दीन जानकी माता॥
राम रसायन तुम्हरे पासा। सदा रहो रघुपति के दासा॥

तुम्हरे भजन राम को पावै। जनम जनम के दुख बिसरावै॥
अंत काल रघुबर पुर जाई। जहाँ जन्म हरि-भक्त कहाई॥
और देवता चित्त न धरई। हनुमत सेइ सर्ब सुख करई॥
संकट कटै मिटै सब पीरा। जो सुमिरै हनुमत बलबीरा॥
जै जै जै हनुमान गोसाईं। कृपा करहु गुरु देव की नाईं॥
जो सत बार पाठ कर कोई। छूटहि बंदि महा सुख होई॥
जो यह पढ़ै हनुमान चलीसा। होय सिद्धि साखी गौरीसा॥
तुलसीदास सदा हरि चेरा। कीजै नाथ हृदय महँ डेरा॥

दोहा

पवनतनय संकट हरन, मंगल मूरति रूप।
राम लखन सीता सहित, हृदय बसहु सुर भूप॥

॥ इति ॥

# संकटमोचन हनुमानाष्टक

### मत्तगयन्द छन्द

बाल समय रवि भक्षि लियो तब तीनहुँ लोक भयो अँधियारो।
ताहि सों त्रास भयो जग को यह संकट काहु सों जात न टारो॥
देवन आनि करी बिनती तब छाँड़ि दियो रबि कष्ट निवारो।
को नहिं जानत है जगमें कपि संकटमोचन नाम तिहारो॥ १॥
बालि की त्रास कपीस बसै गिरि जात महाप्रभु पंथ निहारो।
चौंकि महा मुनि साप दियो तब चाहिय कौन बिचार बिचारो॥
कै द्विज रूप लिवाय महाप्रभु सो तुम दास के सोक निवारो। को०-२॥
अंगद के सँग लेन गये सिय खोज कपीस यह बैन उचारो।
जीवत ना बचिहौ हम सो जु बिना सुधि लाए इहाँ पगु धारो॥
हेरि थके तट सिंधु सबै तब लाय सिया-सुधि प्रान उबारो। को०-३॥
रावन त्रास दई सिय को सब राक्षसि सों कहि सोक निवारो।
ताहि समय हनुमान महाप्रभु जाय महा रजनीचर मारो॥
चाहत सीय असोक सों आगि सु दै प्रभु मुद्रिका सोक निवारो। को०-४॥
बान लग्यो उर लछिमन के तब प्रान तजे सुत रावन मारो।
लै गृह बैद्य सुषेन समेत तबै गिरि द्रोन सु बीर उपारो॥
आनि सजीवन हाथ दई तब लछिमन के तुम प्रान उबारो। को०-५॥
रावन जुद्ध अजान कियो तब नाग कि फाँस सबै सिर डारो।
श्रीरघुनाथ समेत सबै दल मोह भयो यह संकट भारो॥
आनि खगेस तबै हनुमान जु बंधन काटि सुत्रास निवारो। को०-६॥

बंधु समेत जबै अहिरावन लै रघुनाथ पताल सिधारो।
देबिहिं पूजि भली बिधि सों बलि देउ सबै मिलि मंत्र बिचारो॥
जाय सहाय भयो तब ही अहिरावन सैन्य समेत सँहारो। को०-७॥
काज किये बड़ देवन के तुम बीर महाप्रभु देखि बिचारो।
कौन सो संकट मोर गरीब को जो तुमसों नहिं जात है टारो॥
बेगि हरो हनुमान महाप्रभु जो कछु संकट होय हमारो। को०-८॥

दोहा

लाल देह लाली लसे, अरु धरि लाल लँगूर।
बज्र देह दानव दलन, जय जय जय कपि सूर॥

॥ इति संकटमोचन हनुमानाष्टक सम्पूर्ण॥

# श्रीहनुमत्-स्तवन

## सोरठा

प्रनवउँ पवनकुमार खल बन पावक ग्यानघन।
जासु हृदय आगार बसहिं राम सर चाप धर॥

अतुलितबलधामं हेमशैलाभदेहं
दनुजवनकृशानुं ज्ञानिनामग्रगण्यम्।
सकलगुणनिधानं वानराणामधीशं
रघुपतिप्रियभक्तं वातजातं नमामि॥

गोष्पदीकृतवारीशं मशकीकृतराक्षसम्।
रामायणमहामालारत्नं वन्देऽनिलात्मजम्।

अञ्जनानन्दनं वीरं जानकीशोकनाशनम्।
कपीशमक्षहन्तारं वन्दे लङ्काभयङ्करम्॥

उल्लङ्घ्य सिन्धोः सलिलं सलीलं
यः शोकवह्निं जनकात्मजायाः।
आदाय तेनैव ददाह लङ्कां
नमामि तं प्राञ्जलिराञ्जनेयम्॥

मनोजवं मारुततुल्यवेगं जितेन्द्रियं बुद्धिमतां वरिष्ठम्।
वातात्मजं वानरयूथमुख्यं श्रीरामदूतं शरणं प्रपद्ये॥

आञ्जनेयमतिपाटलाननं काञ्चनाद्रिकमनीयविग्रहम्।
पारिजाततरुमूलवासिनं भावयामि पवमाननन्दनम्॥

यत्र यत्र रघुनाथकीर्तनं तत्र तत्र कृतमस्तकाञ्जलिम्।
वाष्पवारिपरिपूर्णलोचनं मारुतिं नमत राक्षसान्तकम्॥

# श्री हनुमंताची आरती (१)

सत्राणे उड्डाणे हुंकार वदनी।
करि डळमळ भूमंडळ सिंधूजळ गगनी ॥
कडाडिले ब्रह्मांड धाके त्रिभुवनी।
सुरवरनर निशाचर त्या झाल्या पळणी ॥१॥
जय देव जय देव जय श्री हनुमंता॥
तुमचेनि प्रतापे न भिये कृतांता ॥धृ.॥
दुमदुमली पाताळे उठिला प्रतिशब्द।
थरथरला धरणीधर मानीला खेद॥
कडकडिले पर्वत उडुगण उच्छेद।
रामी रामदासा शक्तीचा शोध॥२॥
॥जय....॥

## (२)

कोटीच्याही कोटी गगनी उडाला।
अचपळ चंचळ द्रोणाचल घेउनी आला॥
गेला आला गेला कामा बहुताला।
वानर कटका चटका लावुनिया गेला॥१॥
जय देव जय देव जय श्रीबलभीमा।
आरती ओवाळू सुंदर गुणसीमा॥धृ॥
उत्कट बळ ते तुंबळ खळबळली सेना।
चळवळ करिता त्यासी तुळणा दिसेना।
उदंड कीर्ती तेथे मन हे बैसेना।
दास म्हणे न कळे मोठा की साना॥२॥
॥जय....॥



# श्री भीमरूपी स्तोत्र

भीमरूपी महारुद्रा वज्र हनुमान मारुती। वनारी अंजनीसूता रामदूता प्रभंजना ॥१॥

महाबळी प्राणदाता सकळां ऊठवी बळें। सौख्यकारी दुःखहारी धूर्त वैष्णवगायका ॥२॥

दीननाथा हरीरूपा सुंदरा जगदंतरा। पातालदेवताहंता भव्यसिंदूरलेपना ॥३॥

लोकनाथा जगन्नाथा प्राणनाथा पुरातना। पुण्यवंता पुण्यशीला पावना परितोषका ॥४॥

ध्वजांगें उचली बाहो आवेशें लोटला पुढें। काळाग्नी काळरुद्राग्नि देखतां कांपती भयें ॥५॥

ब्रह्मांडे माइलीं नेणो आंवळे दंतपंगती। नेत्राग्नि चालिल्या ज्वाळा भृकुटी ताठिल्या बळें ॥६॥

पुच्छ ते मुरडिलें माथां किरीटी कुंडलें बरीं। सुवर्णकटिकासोटी घंटा किंकिणिनागरा ॥७॥

ठकारे पर्वताऐसा नेटका सडपातळू। चपळांग पाहतां मोठें महाविद्युल्लतेपरी ॥८॥

कोटिच्या कोटि उड्डाणें झेंपावे उत्तरेकडे। मंद्राद्रीसारिखा द्रोणू क्रोधें उत्पाटिला बळें ॥९॥

आणिला मागुती नेला आला गेला मनोगती। मनासी टाकिलें मागे गतीसी तुळणा नसे ॥१०॥

अणूपासोनि ब्रह्मांडायेवढा होत जातसे। तयासी तुळणा कोठें मेरुमांदार धाकुटे ॥११॥

ब्रह्मांडाभोवते वेढे वज्रपुच्छें करूं शके। तयासी तुळणा कैंची ब्रह्मांडी पाहतां नसे ॥१२॥

आरक्त देखिलें डोळां ग्रासिलें सूर्यमंडळा। वाढतां वाढतां वाढे भेदिलें शून्यमंडळा ॥१३॥

भूतप्रेतसमंधादि रोगव्याधि समस्तही। नासती तूटती चिंता आनंदें भीमदर्शनें ॥१४॥

हे धरा पंधरा श्लोकी लाभली शोभली बरी। दृढदेहो निसंदेहो संख्या चंद्रकळा गुणें ॥१५॥

रामदासी अग्रगणू कपिकुळासी मंडणू। रामरूपी अंतरात्मा दर्शनें दोष नासती ॥१६॥

इति श्रीरामदासकृतं मारुतिस्तोत्रं संपूर्णम्।

